स्त्री तत्त्वाचे अन्वय शोधू पाहणाऱ्या...
आभाळाला कवेत घेवून
झेपावणाऱ्या या अन्वेषी.
अवघं आभाळ डोळ्यात सामावून,
जिद्दीचे पंख लेवून,
घेताहेत झेप....आभाळात....

# झेप अन्वेषींची

Community Based Research
in Abortion Incidence

सेहत

अचला तावरे
अनघा कुलकर्णी
अर्चना मांढरे
आश्विनी सरोदे
भाग्यश्री खैरे
दर्शना बनसोडे
गार्गी जोशी
जागृती गायकवाड
ज्योती कुदळे
लक्ष्मी म्हेत्रे
माधुरी सुमंत
मंगल म्हेत्रे
मनिषा काटे
प्रिती भोगले
प्रभा आवळे
प्रमिला धाराशिवकर
पुष्पा भोर
पुष्पा जाधव
राखी काकडे
संध्या धुमाळ
सरिता गुजर
सविता कोतवाल
सारिका वाघमारे
शकुंतला भालेराव
शेली साहा
स्मिता चोरगे
स्मिता शहापूरकर
सुनिता बंडेवार
सुनिता जाधव
तृप्ती जोशी
वैशाली सपकाळ
वैशाली सातपुते

**पहिली आवृत्तीः जानेवारी २००४**

**प्रकाशकः** सेहत
सर्वे नं २८०४-२८०५,
आराम सोसायटी रोड,
वकोला, सांताक्रूज (प),
मुंबई - ४१० ०५५
**फोनः** (०२२) २६६७३१५४, २६६७३५७१
**फॅक्सः** (०२२) २६६७३१५६
**E-mail:** cehat@vsnl.com
**webside:** www.cehat.org



**पुस्तकांच्या प्रति खालील पत्त्यांवर उपलब्ध आहेत-**
३-४, अमन ई टेरेस,
प्लॉट नं १४०, डहाणूकर कॉलनी,
कोथरूड, पुणे- ४११०२९
**फोनः** (०२०) २५४५१४१३, २५४५२३२
**E-mail**: cehatpun@vsnl.com

**मुखपृष्ठ व रेखाचित्रेः** शिरीष घाटे

**डीटीपी व टंकलेखनः** दत्तात्रय तरस आणि शारदा महल्ले

**मुद्रकः** अनिता प्रिंटर्स, पुणे-१४

# अभिप्राय

गर्भपातासारख्या नाजूक व गोपनीय विषयावर संशोधन करण्यासाठी सेहत संस्थेने जो प्रकल्प हाती घेतला होता, त्यामध्ये प्रकल्पात काम करणाऱ्या अन्वेषीचे अनुभव मांडणारी ही पुस्तिका. अनेकदा संशोधन प्रकल्पातून निर्माण झालेलं ज्ञान हे देशी-विदेशी नियतकालिकांच्या मार्फत बुद्धीवंतांपर्यत पोहोचते. पण ज्यांच्या आयुष्यावर आधारित आलेख लिहीले जातात, त्यांच्यापर्यंत मात्र ही माहिती पोहोचत नाही. लोकांपर्यत माहिती पोहोचविण्याचा तळमळीने प्रयास करणारी ही 'सेहत' संस्था.

दुसरे असे की, संशोधन गटाच्या उतरंडीत सर्वोच्च असलेल्या संशोधकांचीच नावे लोकांपर्यंत पोहोचतात. त्यांचा गाजावाजाही होतो. परंतु उन्हातान्हात, पाऊस-पाण्यात, मैलोनमैल चालून माहिती गोळा करणाऱ्या अन्वेषी मात्र अदृष्टाच राहतात. अनेकदा तर या गटाचा निव्वळ वापरही केला जातो. आणि म्हणूनच संशोधन प्रकल्पाच्या कालावधीत अन्वेषिंना आलेले अनुभव व त्यांच्यात घडलेले परिवर्तन जगासमोर मांडणाऱ्या 'सेहत' चे प्रचंड कौतुक करावेसे वाटते.

या पुस्तिकेत अन्वेषिंचे वैयक्तिक आयुष्यातील अनुभव, त्यांची सुख-दुःख, त्यांना कराव्या लागणाऱ्या तडजोडी व त्यांच्या स्वप्नांची सुरेख गुंफण, त्यांच्या वाढत्या ज्ञानाशी व त्यांच्यात घडत असलेल्या बदलाशी केली गेली आहे. स्त्री-आरोग्यावर संशोधन करीत असताना स्वतःच्या आयुष्यातल्या घटना पुन्हा पुन्हा ताज्या होतात, आयुष्यभर भेडसावत असलेल्या अनेक प्रश्नांची कोडी हळूहळू सुटायला लागते. संशोधनाचे काम कोरडे रहात नाही. कारण गोळा केलेली माहिती जिवंत झालेली असते. स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाला स्पर्श करून जात असते. कळत नकळत, अन्वेषिचे व्यक्तीमत्त्व खुलायला लागते. अन्वेषी सबल होते. संशोधनाची आणि व्यक्तिगत आयुष्यातली वाटचाल हातात हात घालून, कामातील व आयुष्यातील अडचणींना सामोरे जाण्याचे धैर्य व कौशल्य बळकट करते.

सेहतच्या अन्वेषिंची ही झेप सुखवणारी आहे. यापुढेही या सर्व मैत्रिणींनी असेच उत्साहवर्धक कार्य करावे, ही मनःपूर्वक शुभेच्छा!

मनीषा गुप्ते,
'मासूम', पुणे

# ऋणनिर्देश

सर्वेक्षणाच्या कामात अनेक गावात जाऊन लोकांशी बोलून अनुसूची भरून घेतली. या सर्व संशोधन सहभागींच्या सहकार्याशिवाय माहिती संकलनाचे काम पूर्णच होऊ शकले नसते. अतिशय प्रतिकूल परिस्थितीत राहणाऱ्या जनसामान्यांनी आमच्याशी बातचीत केली. त्यांच्या कामातील वेळ काढून संशोधनात सहभाग दिला व वास्तव समाज जीवनाचे, माणुसकीचे दर्शन घडवले. या सर्व संशोधन सहभागींचे मनःपूर्वक आभार!

ही पुस्तिका तयार करण्यामध्ये अन्वेषींचा सर्वांत मोठा वाटा आहे. अन्वेषींपैकी कोणालाही लिखाणाची सवय नाही. जेव्हा पुस्तिका तयार करावी ही कल्पना सुचली, तेव्हा उत्साहाने सर्वांनी लिखाण केले. इतकेच नाही तर पुस्तिका परिपूर्ण होण्यासाठी सूचनाही केल्या. त्यांचे मनापासून आभार!

पुस्तिकेची कल्पना डोक्यात आली. अन्वेषींनी लिखाणही केले. पण हे सगळं संकलित करून त्याला पुस्तिकेचं रूप देणं हे खूप महत्त्वाचं काम होतं आणि जर विद्याने ते केलं नसतं तर कदाचित आमची कल्पना कल्पनाच राहिली असती. पुस्तिकेतील सर्वांत महत्त्वाचं काम म्हणजे संकलन आणि ह्या महत्त्वपूर्ण कामाबद्दल विद्या कुलकर्णींचे मनापासून आभार!

पुस्तिकेतील लिखाण आत्मसात करून सृजनात्मक आणि अर्थपूर्ण रेखाचित्रे रेखाटल्याबद्दल शिरीष घाटे यांचेही विशेष आभार!

पुस्तिकेच्या सुरुवातीपासून प्रकाशनापर्यंत टंकलेखन, संगणकीय सहाय्य व इतर व्यवस्थापकीय मदत किरण मांडेकर, शारदा महल्ले व रवि मांडेकर यांनी उत्साहाने केली.

दत्तात्रय तरस यांनी संगणकीय कौशल्याचा उपयोग तन्मयतेने करून दिला याबद्दल त्यांचेही मनापासून आभार.

# अनुक्रम

# • सेहतची मुलभूत तत्वे •

- समाजोपयोगी संशोधन व इतर काम
- नीतीमूल्याधिष्ठीत काम
- लोकशाही पद्धतीने काम करण्याची संस्थेची बांधिलकी
- सामाजिक बांधिलकीच्या दृष्टीकोनातून करण्यात येणार काम

## • सेहतमधील कामाच्या मुख्य संकल्पना व विषय •

१. आरोग्यसेवा आणि अधिकारण :—

या संकल्पनेअंतर्गत खालील गोष्टींचा समावेश होतो :—

- आरोग्याचे मूलभूत घटक
- लोकांचे आरोग्याचे प्रश्न
- लोकांचे आरोग्यसेवा व्यवस्थेमधील प्रश्न
- आरोग्यसेवेची सद्य परिस्थिती
- आरोग्यसेवेची लोकाभिमुख चिकित्सा
- [illegible]

२. आरोग्यविषयक कायदा, वैद्यकीय नीतीमूल्ये व रुग्णांचे हक्क :—

[illegible]

- [illegible]
- [illegible]

३. स्त्री आणि आरोग्य :—

[illegible]

- [illegible]
- [illegible]

Research :- जनआरोग्याच्या प्रश्नांबाबत संशोधन

Action :- केलेल्या संशोधनातील निष्कर्षांवर योग्य कृती

Service : निष्कर्षांवर आधारलेले प्रशिक्षण

Advocacy :- प्रशिक्षण व आवश्यक जनजागरण

सेहतची स्थापना - १ एप्रिल, १९९४.

आरोग्य संदर्भात सामाजिक प्रश्नांवर संशोधन करणे हे प्रमुख उद्दिष्ट्य.

## आम्ही काय शिकलो व कशासाठी...

आमचे प्रशिक्षण

### सेहतची ओळख

- स्वतःच्या माहितीसाठी • घरच्यांच्या माहितीसाठी.
- सर्वेक्षणाच्या स्थान सुरुवात देणाऱ्या व्यक्तींना व इतरांना आपल्या संस्थेची ओळख करून देणे.

### स्त्री आरोग्य व गर्भपात

- विषयाची गहनता समजण्यासाठी.
- विषयाचा सामाजिक संदर्भ समजावून घेण्यासाठी.
- स्त्री केंद्रीत दृष्टिकोन समजून घेण्यासाठी.
- आरोग्याचे व गर्भपाताचे राजकीकरण समजून घेण्यासाठी.

### कौशल्ये व नितीमूल्ये

- उद्दिष्ट्ये पूर्ण होण्यासाठी • काम सुकर होण्यासाठी.
- नितीमूल्याधिष्ठित व गुणवत्तात्मक माहिती
- बैठकीचे नियोजन • संभाषण कौशल्ये. व्यक्तिगत व गावसभा पातळी
- साधने समजून घेण्यासाठी व त्यांचा वापर.

### राजकीय प्रशासकीय व्यवस्था व आरोग्य यंत्रणा

- सर्व व्यवस्थेच्या किमान आवश्यक माहितीसाठी.
- आपण माहिती मिळविताना आपला तालुका गाव व वॉर्ड
- पातळीवरील सरकारी कार्यालयाशी संबंध साधणार आहोत त्यासाठी
- माहिती होणे जरूरीचे

### समाज व्यवस्था
(धर्म, जात लिंगभाव)

- समाजातील स्त्रीचे दुय्यम स्थान
- पुरुषप्रधान संस्कृती

**सेहतविषयी -**

**अन्वेषींनी तयार केलेल्या**

**पोस्टर प्रदर्शनातून**

**प्रकल्पाविषयी -**

**अन्वेषींनी तयार केलेल्या पोस्टर प्रदर्शनातून**

नितीमूल्याधिष्ठित संशोधना-साठी खालील गोष्टी प्रामुख्याने पाळल्या पाहिजेत

- मुलाखत देणाऱ्या व्यक्तीची संमती मिळवणे.
- मुलाखत देणाऱ्या व्यक्तीला तिच्याकडून घेतलेल्या माहिती संदर्भातील गोपनियता राखण्यासंबंधी मुलाखतकर्त्याकडून विश्वास व खात्री.
- मुलाखत घेताना एकांतासाठी प्रयत्न.

मुलाखत देणाऱ्या व्यक्तीची जिज्ञासेची पूर्तता करणे प्रकल्पासाठी मुलाखत देणाऱ्या व्यक्तिंकडून मिळवलेल्या माहितीचे एकत्रित विश्लेषण करून काढलेले निष्कर्ष त्यांच्यापर्यन्त सारांश रूपाने पोहोचवण्याच्या प्रयत्न करणे.

# पुस्तकाविषयी.....

सर्वेक्षण वा माहिती संकलनाचे काम हे कोणत्याही संशोधन प्रकल्पाचा पाया आहे. गर्भपात दर मापनाच्या संशोधन प्रकल्पाचे काम सेहतने २००१ साली हाती घेतले. पूर्ण महाराष्ट्रातून लोकांना भेटून माहिती संकलनाचे - डाटा जमवण्याचे काम करायचे होते. यासाठी किमान दहावी झालेल्या मुलींची निवड करण्यात आली.

सर्वेक्षणार्थी या मर्यादित भूमिकेतून निवड झालेल्या या मुलींचा उत्साह, सहभाग एवढा लक्षणीय होता की त्यांनी या भूमिकेपलीकडे जाऊन आपली जबाबदारी निभावली, म्हणूनच फील्ड रीसर्चर अथवा अन्वेषी या भूमिकेने आम्हीही या जबाबदारीकडे पाहू लागलो. अन्वेषींच्या सक्षमीकरणावरही विशेष भर देण्यात आला.

सुमारे नऊ महिन्याच्या काळात अन्वेषी गटातील मुलींमध्ये झालेले सकारात्मक बदल, त्यांची व्यापक झालेली दृष्टी, अनुभवाचे समृध्द संचित याविषयी त्यांच्याच नजरेतून, त्यांच्याच शब्दात केलेले भाष्य हा या पुस्तकाचा प्रमुख भाग आहे.

बहुतेक संशोधन प्रकल्पात सर्वेक्षणार्थी कामाच्या ठराविक टप्प्याशी संबंधित असतात. तात्पुरत्या कालावधीसाठीच हा स्टाफ घेतला जातो. तथापि त्यांचे काम प्रकल्पासाठी व संशोधनाची गुणवत्ता राखण्यासाठी महत्त्वाची भूमिका बजावते. हे महत्त्व ओळखून या स्टाफच्या संबंधाने काही नैतिक जबाबदाऱ्या अनिवार्य ठरतात. अन्वेषींच्या वाढीसाठी, विकासासाठी संधी आणि अवकाश तयार करणे ही त्यातील एक महत्त्वाची जबाबदारी आहे. काम, जबाबदाऱ्या याविषयी या गटाशी चर्चा व विचारविनियमाने नियोजन करणे, मोकळा संवाद राखणे ही सुध्दा आणखी एक जबाबदारी आहे. या दृष्टीने या प्रकल्पात काही प्रयत्न जाणीवपूर्वक केले. त्याची ओळख या पुस्तकात दिलेली आहे.

या संशोधन प्रकल्पात मुख्य प्रवाहातील तसेच स्त्रीवादी संशोधन पध्दतीचा प्रामुख्याने अवलंब केला. विशेषतः कार्यपध्दतीत काही वेगळ्या प्रकारच्या वाटा चोखाळून पाहिल्या. त्यांची नोंद करण्याच्या उद्देशाने या पुस्तकाची निर्मिती केली. हे पुस्तक हा काही संशोधन प्रकल्पाच्या कामाचा नियोजित भाग नव्हता. परंतु कामाच्या प्रक्रियेतून आणि अन्वेषींच्या सक्रीय, मनःपूर्वक सहभागातून पुस्तकाची कल्पना पुढे आली. कार्यक्षेत्रातील माहिती संकलनाचे काम करणारा, त्याकरिता परिश्रमपूर्वक प्रयत्न करणारा गट, त्यांची कौशल्ये, योगदान बऱ्याचदा पडद्याआड राहते. त्याची योग्य दखल घेण्यासाठीही पुस्तकाचे माध्यम उपयुक्त वाटले.

प्रशिक्षण, सर्वेक्षणाचे काम, बैठका यामध्ये वेळोवेळी अन्वेषींनी केलेले लेखन या पुस्तकासाठी घेतले आहे. तसेच काम संपल्यावर काही काळाने त्यांचे मत समजाऊन घेण्यासाठी विशेष बैठका घेऊन त्यांच्याशी बातचीत केली. यातून तयार झालेले लेखन त्यांच्याच शब्दात मांडले आहे. त्यांच्या अनुभवाचे महत्त्व आणि वेगळेपण अधोरेखित करण्यासाठी काही निरीक्षणे, नोंदी व टिप्पणीची जोड दिलेली आहे.

तरूण मुलींशी संवाद साधून त्यांच्यातील विचारप्रक्रियेला खतपाणी घालण्याची संधी प्रकल्पाच्या कामातून अनपेक्षितपणे मिळाली. कोणतेही काम घडवत असताना आपणही घडत जातो, हा अनुभव अन्वेषींच्या साथीने आम्ही घेतला. हा अनुभव आपल्यापर्यंत पोहोचवण्यासाठी हे पुस्तक आहे. तुम्हालाही या अनुभवाचे वेगळेपण प्रेरणादायी वाटेल व पुस्तक उपयुक्त ठरेल, ही अपेक्षा.

# प्रकल्पाची ओळख

## गर्भपातविषयक अभ्यास

सामाजिक आरोग्याशी निगडीत विषयांवर संशोधनाचे काम करणारी 'सेहत' ही संस्था आहे. समाजात एकंदर गर्भपाताचे प्रमाण काय आहे याचे संशोधन करण्यासाठी संस्थेतर्फे व्यापक स्तरावरचा अभ्यास हाती घेण्यात आला. गर्भपात दर पाहणे, गर्भपातासाठी कोणत्या आरोग्य सेवा वापरल्या जातात ते पाहणे आणि त्यासाठी केला जाणारा एकंदर खर्च किती याचा अंदाज घेणे हे या अभ्यासाचे तीन प्रमुख भाग होते.

यापूर्वीही सेहततर्फे गर्भपात या विषयावर अभ्यास करण्यात आला होता. यामध्ये स्त्रीच्या दृष्टिकोनातून गर्भपात आणि गर्भनिरोधकांबद्दल मांडणी करण्यासाठी ग्रामीण स्त्रियांशी या विषयासंबंधी चर्चा-गोष्टी करून अनमोल माहिती गोळा केली होती.

हा पूर्वानुभव जमेस धरून गर्भपात दर मापनाचा अभ्यास हाती घेतला. या प्रकल्पाचे सर्वसाधारण उद्देश गर्भपात दर व त्यावर परिणाम करणाऱ्या घटकांचा चिकीत्सक अभ्यास करणे आणि गर्भपात सेवांची उपलब्धता, निवड व त्यावरील खर्च यांची सविस्तर माहिती संकलित करणे हा होता. गर्भपात कायदेशीर आहे. स्त्रियांना सुरक्षित, वैध आणि किफायतशीर गर्भपात सेवा मिळाली पाहिजे. पण वस्तुस्थिती काय आहे? या अभ्यासातून या वास्तवावर प्रकाश टाकता येईल, धोरणकर्त्यांसाठी ठोस सूचना पुढे आणता येतील या अपेक्षेने अनेक बारकाव्यांचा विचार केला गेला आहे. प्रजनन वयोगटातील किमान एक गर्भपात झाला आहे अशा स्त्रियांचे प्रमाण किती, प्रत्येक स्त्री मागे सरासरी गर्भपात प्रमाण किती, नैसर्गिक व कृत्रिम गर्भपाताचे प्रमाण किती व त्यामागची कारणे काय. गर्भपाताशी संबंधित आजारांचे प्रमाण व प्रकार काय आहेत, गर्भपात करवून घेण्याची वा होण्याची कारणे कालानुरूप बदलेली आहेत का, सामाजिक-आर्थिक परिस्थितीचा या घटनेवर किती प्रभाव पडतो, कोणती गर्भपात सेवा स्त्रियांना उपलब्ध होते व त्यासाठी किती खर्च येतो, प्रत्यक्ष खर्चाबरोबरच अप्रत्यक्ष खर्च म्हणजे स्त्रीची, कुटुंबियांची त्या दिवसात मजुरी बुडते इ. असा खर्च किती येतो, गर्भपात पश्चात तिची पुरेशी काळजी घेतली जाते का, आवश्यक विश्रांती मिळते का या सर्वांसंबंधी वास्तव चित्र पुढे आणणे अशी संशोधनाची उद्दिष्टे होती.

सेहतच्या आजवरच्या कामाप्रमाणेच या संशोधनाची कार्यपद्धतीही लिंगभाव संवेदनशील आणि नीतिमूल्याधिष्ठीत असण्याचा आमचा आग्रह होता.

आपल्या समाजात स्त्री आरोग्याविषयी बरेच पूर्वग्रह आहेत. स्त्रियांची आरोग्यविषयक स्थिती आणि गरजा यांची विशेषत्वाने दखल घेतली जात नाही. गर्भपात हा तर अधिकच दुर्लक्षित विषय आहे. या विषयी उघडपणे बोलायचे नाही असाच रूढ संकेत आहे. या नाजूक विषयासंबंधी अभ्यासाचे काम व्यापक स्तरावर, म्हणजे पूर्ण महाराष्ट्र राज्यातील प्रातिनिधिक नमुना घटक (सॅम्पल) निवडून करायचे होते. यासाठी आवश्यक पूर्वतयारी, खबरदारी आणि विषयाची समज असलेल्या संशोधक कार्यकर्त्यांचा गट बरोबर असणे अत्यावश्यक होते. लोकांना, विशेषतः स्त्रियांना विश्वासात घेणारी आणि त्यांचा आत्मसन्मान राखून माहिती संकलित करण्याची कार्यपद्धती असणेही जरुरीचे होते.

सर्व विषयांच्या पार्श्वभूमीवर संशोधनासाठी महाराष्ट्राच्या ग्रामीण भागातील ३००० व शहरी भागातील २००० अशा एकूण ५००० कुटुंबांची शास्त्रीय पद्धतीने निवड करण्यात आली. ही ५००० कुटुंबं म्हणजे संशोधनाचे सॅम्पल वा नमुना. नमुनानिवडीनंतर घरमोजणी वा घरांची यादी बनवण्याचा टप्पा होता. यासाठी नमुना (सॅम्पल) निवडीनुसार घरोघरी भेट देऊन घरांची नोंद करण्यात आली. त्यानंतर घरांची माहिती अनुसूची व स्त्रियांची माहिती अनुसूची या दोन सविस्तर मुलाखत अनुसूचीद्वारे गावात जाऊन, कुटुंबांना भेटी देऊन व्यक्तिगत संवादातून संशोधनास आवश्यक त्या माहितीचे संकलन केले गेले.

## कार्यक्षेत्रातील माहिती संकलन

माहिती संकलन हा संशोधन प्रकल्पातल्या प्राथमिक टप्प्यातला महत्त्वाचा भाग होता. गर्भपात या गुप्ततेचं वलय असणाऱ्या विषयाविषयी स्त्रियांकडून माहिती घ्यायची होती. तीही अनोळखी स्त्रियांकडून. अनोळखी गावात जाऊन तिथल्या लोकांना संस्थेची ओळख करून द्यायची, प्रकल्पाचे उद्देश व कामाचे स्वरूप समजाऊन सांगायचे आणि कामासाठी त्यांचे सहकार्य संपादित करायचे होते. संशोधनाची गुणवत्ता राखण्यासाठी माहिती संकलन योग्य प्रकारे होणं अतिशय आवश्यक होते. त्यामुळे हे काम करण्यासाठी योग्य व्यक्तिंची निवड होणे जरुरीचे होते.

संशोधनाचा विषय स्त्रियांशी संबंधित असल्याने माहिती संकलनाच्या कामासाठीही स्त्रियांची निवड करण्याचे ठरले. या कामासाठी एकूण २७ स्त्रिया, मुलींची निवड करण्यात आली. त्यापैकी २१ जणी अखेरपर्यंत कामात राहिल्या. माहिती संकलनाच्या कामानंतरही काहीजण प्रकल्पाच्या अन्य कामात आमच्या बरोबर राहिल्या.

या निवडीसाठी वर्तमानपत्रातून जाहिराती देऊन, महाविद्यालये व विद्यापीठात नोटीस लावून अर्ज मागवण्यात आले. किमान दहावी झालेली असावी ही प्रमुख अपेक्षा होती. सामाजिक शास्त्रांचा अभ्यास वा पदवीपर्यंतचे शिक्षण या शैक्षणिक पार्श्वभूमीपेक्षाही शिकण्याची व कामाची तयारी असण्याला अधिक प्राधान्य दिले व निवड करण्यात आली. सेहतच्या यापूर्वीच्या कामातही कमी शैक्षणिक गटातील स्त्रियांनी अत्यंत सरस काम केल्याचा आमचा अनुभव होता. प्रत्यक्ष अनुभव अधिक खुलेपणाने बघण्याची आणि समजाऊन घेण्याची त्यांची वृत्ती संशोधनाला पूरक ठरते.

## संशोधक 'अन्वेषी' विषयी

संशोधन प्रकल्पातील कार्यक्षेत्र संशोधकाची जबाबदारी मुलींच्या गटाने पार पाडली. त्यामुळेच आम्ही त्यांना रूढ पद्धतीप्रमाणे 'सर्वेक्षणार्थी' असे न संबोधता 'कार्यक्षेत्र संशोधक' अथवा 'अन्वेषी' असे संबोधायचे ठरवले. सर्वेक्षणार्थी ही भूमिका खूपच सीमित आहे. 'सांगेल ते काम करणे' एवढीच अपेक्षा या शब्दातून ध्वनित होते व तशीच ती रूढ पद्धत झालेली आहे. माहिती संकलन करणाऱ्या गटाचा कार्यक्षेत्रातील कामात व प्रकल्पाच्या प्रक्रियेत सक्रीय सहभाग असणे महत्त्वाचे आहे. त्यांचे प्रकल्पकामातील योगदान अतिशय मोलाचे आहे. या भूमिकेतून कार्यक्षेत्र संशोधनाची जबाबदारी सांभाळण्याऱ्या गटाचे 'अन्वेषी' हे नामकरण करण्यात आले.

अन्वेषींच्या गटाच्या शैक्षणिक पातळीत भिन्नता होती. किमान दहावी शिक्षण झालेल्यांपासून पदवीचे शिक्षण घेणाऱ्या मुली या गटात होत्या. काहींचे पदव्युत्तर शिक्षणही झालेले होते. बऱ्याच जणी कमी उत्पन्न गटातल्या होत्या. निम्म्याहून अधिकजणी कर्वे शिक्षण संस्थेत शिक्षण घेतलेल्या वा घेत असलेल्या होत्या. बहुसंख्य मुलींसाठी ही पहिलीच नोकरी होती. त्यामुळे गटात काम करणे अथवा गावोगावी प्रवास करणे, लोकांशी संवाद साधणे या सर्व गोष्टींचा त्यांना अनुभव नव्हता. तथापि अतिशय प्रतिकूल परिस्थितीत शिक्षण घेतल्याने कष्टाचे, वैयक्तिक जीवनातील कडू-गोड अनुभवांचे पदर प्रत्येकीच्या व्यक्तिमत्त्वाला होते. चारजणींचा विवाह झालेला होता. तथापि त्या विभक्त रहात होत्या वा त्यांचा घटस्फोट झालेला होता. शैक्षणिक स्तराबाबत वरखाली असले तरी वय, सामाजिक व आर्थिक पार्श्वभूमी आणि खडतर जीवनानुभव या बाबतीत अन्वेषींचा गट सर्वसाधारणतः एकसमान पातळीवर होता.

## प्रदीर्घ प्रशिक्षण

कोणत्याही संशोधन प्रकल्पात कार्यक्षेत्र संशोधक वा सर्वेक्षणार्थींना त्यांच्या कामाविषयी प्रशिक्षण देणे जरुरीचे असते. तथापि बहुतेकदा हे प्रशिक्षण त्यांच्या जबाबदाऱ्यांपुरतेच मर्यादित असते. या प्रकल्पात आम्ही प्रशिक्षणाचा काहिसा व्यापक अर्थाने विचार केला व प्रकल्प विषयाला अनुरूप सर्वसमावेशक असे प्रशिक्षण देण्याचे ठरवले. याचे कारण म्हणजे गटातील मुलींची संख्या बरीच होती. शिवाय त्यांच्या शैक्षणिक स्तरामध्ये तफावत होती. संशोधन विषयावर कार्यक्षेत्रातून माहिती घेताना आधी मुलींचीही त्याबाबतची समज तयार होणे आवश्यक होते.

माहिती संकलनासाठी साधन म्हणूनच केवळ या व्यक्तिंचा वापर होऊ नये तर त्यांच्यासाठीही ही प्रक्रिया अधिक अर्थपूर्ण असावी, असे आम्हाला वाटले. अन्वेषींना कामाची कौशल्ये संपादित होण्याबरोबरच त्यांच्या विचारप्रक्रियेला चालना देण्याचा प्रयत्नही आम्हाला प्रशिक्षणातून साधायचा होता. त्यांच्या अंगी असलेली कौशल्ये, गुण यांना वाव मिळावा व त्यांचा समाजाकडे बघण्याचा दृष्टिकोन तयार व्हावा, हे ही हेतू होते.

एकूण तीन आठवड्यांच्या या प्रशिक्षण कार्यक्रमाला अन्वेषींच्या गटाकडूनही सकारात्मक प्रतिसाद मिळाला. प्रशिक्षणामध्ये पुढील विषयांचा समावेश होता. प्राथमिक भर स्त्री आरोग्य आणि गर्भपात याविषयी समज व दृष्टिकोन विकसित करणे हा होता. समाजात गर्भपाताविषयी ज्या रूढ, एकांगी समजुती आहेत त्यांचा प्रभाव अर्थातच अन्वेषींच्या मनावरही होता. ही अपुरी, चुकीची आणि पूर्वग्रहदूषित समज बदलण्यासाठी या विषयाचे विविध पैलू त्यांच्यासमोर मांडण्यात आले. आपल्या दैनंदिन जीवनात खोलवर रूजलेली

लिंगभावाची पाळेमुळे, वर्ग आणि जात या संस्थांमुळे विषमतेला मिळणारे खतपाणी याविषयीही सखोल माहिती आणि चर्चा घेतल्या. राजकीय आणि प्रशासकीय संरचनाचींही ओळख करून दिली प्रकल्पाची पार्श्वभूमी, भूमिका, उद्देश याची स्पष्टता येण्यासाठी सत्रे झाली.

कार्यक्षेत्रातील कामास आवश्यक कौशल्यविकास हा प्रशिक्षणाचा दुसरा महत्त्वाचा भाग होता. घरमोजणी कशी करायची, कार्यक्षेत्र माहिती, घर व स्त्रियांची मुलाखत अनुसूची कशी भरायची याची सविस्तर माहिती दिली गेली व सरावही करून घेतला. घरमोजणीचे काम करण्याची जबाबदारी कार्यक्षेत्र संशोधकांवर देण्याचा निर्णय ऐनवेळी घ्यावा लागला. कारण या कामासाठी आवश्यक पात्रतेच्या व्यक्ती उपलब्ध होऊ शकल्या नाहीत. यासंबंधी अन्वेषीची मते आजमावली व चर्चेअंती त्यांनी जबाबदारी स्वीकारली. तसे हे काम जिकीरीचे आणि कष्टाचेही, तरीही अन्वेषींनी ही जबाबदारी चांगल्या पद्धतीने पेलली.

कार्यक्षेत्रातील एक महत्त्वाचा कार्यक्रम म्हणजे गावसभा. कोणत्याही नव्या गावात गेल्यावर प्रत्यक्ष मुलाखतींना सुरुवात करण्याआधी त्या गावात एक अथवा दोन गावसभा घेण्याचे आम्ही ठरवले होते. या प्रकल्पात आम्ही केलेला हा प्रयत्न अनेक अर्थांनी वेगळा होता. बहुतेकदा अशा बैठका कोणी घेत नाही. पण गावाचा माहितीपूर्ण सहभाग व संमती प्राप्त करण्यासाठी आम्हाला याची गरज वाटली. गावाशी ओळख करून घेणे आणि गावातील स्त्री-पुरुषांना संस्थेची व प्रकल्पाची माहिती करून देणे हे या बैठकांचे उद्देश होते. या बैठका घेणे हे कौशल्याचे काम होते. आपल्या कामात गावाचे सहकार्य मिळवण्यासाठी या बैठका महत्त्वाच्या होत्या. गावसभेची रूपरेषा ठरवलेली होती. पोस्टर्स, पुस्तके, माहितीपत्रके असे साधन साहित्यही बरोबर होते. तथापि लोकांचा सहभाग मिळवणे, त्यांच्या प्रश्नांची नीट उत्तरे देता येणे, सभा सुरळीतपणे चालवता येणे, लोकांशी संवाद साधता येणे या व अशा बाबी गावाच्या स्वभावावर व परिस्थितीवर अवलंबून होत्या. यासाठीच प्रशिक्षणात संवादकौशल्यावर भर दिला. प्रत्यक्ष गावसभा घेऊन अन्वेषींनी आत्मविश्वासाने सभा चालवण्याचे तंत्र आत्मसात केले.

घर व स्त्रियांची मुलाखत अनुसूची भरणे हेही कौशल्याचे आणि जबाबदारीचे काम होते. विशेषतः स्त्रियांची मुलाखत घेताना त्यांनी सांगितलेली माहिती गोपनीय राहील याची खात्री देणे, मुलाखतीला त्यांची ज्ञात संमती मिळवणे या आवश्यक पायऱ्या होत्या. मुलाखत देणाऱ्या व्यक्तीबद्दल आदर बाळगणे, मुलाखत वा माहिती न देण्याच्या त्यांच्या अधिकाराचा आदर करणे या मुद्दयांची गरजही प्रशिक्षणातून अधोरेखित करण्यात आली.

प्रशिक्षणाच्या उद्देशांपैकी एक महत्त्वाचा भाग म्हणजे अन्वेषींच्या गटाचे परस्पर संबंध दृढ होणे आणि गटाची समूहभावना तयार होणे. विविध खेळ, गप्पा, अनुभवांची देवाणघेवाण यातून एकमेकींशी ओळख होण्यास आणि मैत्री जोडली जाण्यास मदत झाली. घरापासून दूर, अनोळखी भागात एकमेकींबरोबर काम करताना गटातील सदस्यांचाच एकमेकींना आधार होणार होता, मदत होणार होती. त्यासाठी परस्परांशी खुला परिचय होणं अत्यंत आवश्यक होते.

नीतीमूल्याधिष्ठीत संशोधन म्हणजे काय आणि त्याचे महत्त्व याची समज तयार होण्यासाठीही प्रशिक्षणात विशेषत्वाने भर दिला. कोणत्याही परिस्थितीत आपला व्यवहार नीतीमूल्यांशी तडजोड करणारा असू नये. केवळ संशोधनातच नव्हे तर दैनंदिन व्यवहारातही नीतीमूल्यांचे महत्त्व आहे. या विषयाचा, विचारप्रवाहाचा इतिहास, गरज व

प्रकल्पासंदर्भात त्याचे स्वरूप याची सविस्तर मांडणी करण्यात आली. संशोधकाची कार्यक्षेत्रातील लोकांप्रती नैतिक जबाबदारी आणि संस्थेची प्रकल्पावर काम करणाऱ्या स्टाफप्रती असलेली नैतिक जबाबदारी या दोन्ही बाबींवर पुरेशी स्पष्टता आणण्याचा प्रयत्न करण्यात आला.

प्रशिक्षणामध्ये प्रशासकीय बाबींही स्पष्ट करण्यात आल्या. यामध्ये आर्थिक बाबी, नियम, त्यांचे अधिकार, पगार व अन्य सुरक्षा सुविधा याविषयी स्पष्टता आणण्यात आली. सर्वसाधारणतः कोणत्याही संशोधन प्रकल्पात माहिती संकलन करणाऱ्या व्यक्तिंना इतके सखोल स्वरूपाचे प्रशिक्षण दिले जात नाही. आम्ही ते दिले व त्याचा परिणामही प्रशिक्षणादरम्यान जाणवायला लागला. विषयाची समज वाढली. आपसात मैत्री बंध तयार व्हायला लागले. सुरक्षित गर्भपात म्हणजे काय, त्याची आवश्यकता, गर्भपाताचा कायदा इत्यादी मुद्दयांची समज तयार झाली.

## अन्वेषींच्या पालकांसाठी कामाची ओळख

प्रशिक्षणानंतर पूर्वचाचणी व त्यानंतर प्रत्यक्ष फील्डवर्क अशी कामाची पुढील आखणी होती. यासाठी अन्वेषींना बऱ्याच काळासाठी घरापासून लांब राहावे लागणार होते. त्यामुळे त्यांच्या घरच्यांमध्ये काळजीचे वातावरण होते. या पार्श्वभूमीवर पालकांना वा कुटुंबियांना कामाचे स्वरूप स्पष्ट करणे योग्य ठरेल असे आम्हाला वाटले. पालक सभा घेण्याची कल्पना अन्वेषींनी मांडली. मग या सभेचे नियोजनही त्यांच्याच पुढाकाराने, सक्रीय सहभागाने झाले. संस्थेची ओळख आणि प्रकल्पाची, कामाच्या स्वरूपाची माहिती पालकांना करून देणे, मुलीच्या सुरक्षेची हमी देणे इ. हा या सभेचा एक भाग होता. त्याचबरोबर अन्वेषी त्यांच्या आजवरच्या कामातून, प्रशिक्षणातून काय शिकल्या हेही पालकांसमोर मांडायचे होते. त्यासाठी अन्वेषींनी गर्भपात विषयावरचे एक सविस्तर पोस्टर प्रदर्शन तयार केले. पालक सभेत शपथविधीचा आणखी एक महत्त्वाचा कार्यक्रम घेतला. आपले कार्यक्षेत्रातील काम जबाबदारीने व नीतीमूल्याधिष्ठित संशोधनाला अनुसरून करण्याची अन्वेषींनी सामूहिक शपथ घेतली. या सभेमुळे पालकांना त्यांच्या मुलींच्या सुरक्षेची खात्री तर पटलीच शिवाय कामासाठी उत्साहवर्धक वातावरणनिर्मिती तयार होण्यास मदत झाली. मुलींचाही आत्मविश्वास वाढला.

## प्रत्यक्ष कार्यक्षेत्रात

माहिती संकलनाचे काम सप्टेंबर २००१ ते मार्च २००२ या कालावधीत चालले. सर्वेक्षणाच्या या कामासाठी अन्वेषींचे चार गट तयार करण्यात आले. प्रत्येक गटाबरोबर एक वा दोन संशोधक गट प्रतिनिधी होत्या. सर्वेक्षणाच्या कामात सारखेपणा राहावा यासाठी एक संदर्भ पुस्तिका तयार करण्यात आली. या पुस्तिकेमध्ये प्रकल्पाची माहिती, प्राथमिक नमुना घटकांची माहिती, कोडींग, शास्त्रीय व नीतीमूल्याधिष्ठित संशोधनाचे महत्त्व व त्याची कार्यवाही याविषयी मांडणी होती. तसेच अनुसूचीतील प्रत्येक प्रश्नाचा उद्देश, माहिती घेण्याची पद्धती, ज्ञात संमती घेण्याची पद्धत व त्याचे महत्त्व आदी कार्यक्षेत्रातील कामास उपयुक्त अशी सविस्तर माहिती नमूद करण्यात आली होती. अन्वेषींनी ही संदर्भ पुस्तिका वापरून त्यावर ज्या ठोस सूचना केल्या त्यांचाही समावेश करण्यात आला व त्यानुसार योग्य ते बदलही करण्यात आले.

या सर्व तयारीनिशी फील्ड वर्कला सुरुवात करण्यात आली. एकूण चार गट नियोजनानुसार विविध भागात फिरून माहिती संकलनाच्या कामास लागले. तयारी करून सुरुवात झाली असली तरी कामात अनेक अडचणीही आल्या. प्रत्येक गावात साधारणतः तीन दिवसात काम पूर्ण व्हावे असा आमचा अंदाज होता. गाव, घर यांचे अचूक नकाशे काही वेळा उपलब्ध न होणे, नमुना घटकातील घरे न सापडणे या अडचणी होत्या. तसेच गावात निवासाची व्यवस्था होणे, लोकांचा प्रतिसाद मिळणे, मुलाखतीसाठी सहकार्य मिळवणे यासाठीही विशेष प्रयास पडत होते. त्यामुळे कामाचा शारीरिक व मानसिक पातळीवर बराच ताण अन्वेषींवर पडत होता. पहिल्या एक दोन नमुना घटकांच्या अनुभवानंतर या काही अडचणींवर मात करता आली. तरीही अन्वेषींनी कार्यक्षेत्रातील त्रासाची पर्वा न करता व जबाबदारी पार पाडण्याच्या बांधिलकीने पूर्ण केले, याची विशेष नोंद करणे जरुरीचे आहे.

कार्यक्षेत्रातील कामांचा आढावा घेण्यासाठी, एकमेकींच्या अनुभवांची देवाणघेवाण होण्यासाठी आणि पुढील नियोजनासाठी अन्वेषींच्या गट बैठका उपयुक्त ठरल्या.

प्रत्येक गावात सुरुवातीला गावसभांचे आयोजन केले जाई. हा संशोधन प्रकल्पाचा विशेष कार्यक्रम म्हणायला हवा. कारण कोणत्याही संशोधनात या प्रकारे गावसभा घेण्याचे प्रयत्न सहसा होत नाहीत. संस्थेची, कामाची गावकऱ्यांना माहिती व्हावी आणि त्यातून त्यांचे सहकार्य मिळायला मदत व्हावी, हा हेतू तर या सभांमागे होताच. शिवाय ग्रामस्थांना कामासंदर्भात काही प्रश्न विचारायचे असतील तर त्यालाही वाव मिळावा, हा कामातील पारदर्शकतेचा भागही या सभांतून साधयाचा होता. तो बऱ्याच प्रमाणात साधताही आला. बहुतेक ठिकाणी या सभांना प्रतिसाद मिळाला.

घराची व स्त्रियांची मुलाखत अनुसूची भरून घेणे हेही जोखमीचे काम होते. विशेष म्हणजे हे काम सुरु करण्यापूर्वी समोरच्या व्यक्तिची संमती व सहकार्य असणे अभिप्रेत होते. स्वतःचे गरोदरपण वा गर्भपात याविषयी स्त्रियांना बोलते करणे यासाठी सर्वप्रथम त्यांचा विश्वास संपादन करणे जरुरीचे असायचे. आपल्या अनुभवांविषयी बोलण्याचा स्त्रियांना मानसिक, भावनिक पातळीवर त्रासही व्हायचा. स्वतःचे वय, लग्नाचे वर्ष, गरोदरपण वा गर्भपाताचे वर्ष इ. माहिती अचूकपणे सांगणेही कित्येकींना शक्य नव्हते. अशा वेळी कालानुक्रम कसा ठरवायचा याची आम्ही विकसित केलेली कार्यपद्धतही उपयोगात आणत असू. आपले आरोग्याचे अनेक प्रश्नही स्त्रिया खाजगीत विचारायच्या. एकंदरीतच स्त्री आरोग्याबद्दलची अनभिज्ञता आणि हेळसांड यांचे चित्र स्त्रियांशी बोलताना जाणवत राही. स्वतःला खात्रीलायक माहिती असलेल्या आरोग्यविषयांवर सल्लामसलत करणे, आरोग्य सेवांची माहिती देणे, जवळपासच्या भागात ओळखीची समाजसेवी संस्था असल्यास त्यांचा संदर्भ देणे अशी मदत अन्वेषी आवर्जून करत असत. काही व्यक्तिंना उपचार मिळण्यासाठीही प्रयत्न करण्यात आले.

एकूण सात महिन्याचे माहिती संकलन आणि प्रशिक्षण व अन्य कामाचे दोन महिने मिळून नऊ महिन्याच्या कालावधीत अन्वेषींचा गट सेहतच्या संशोधन प्रकल्पात सहभागी झाला. कार्यक्षेत्रातील माहिती संशोधनात अन्वेषींचा महत्त्वपूर्ण वाटा राहिला आहे.

## संशोधनाचे सर्वसाधारण ध्येय

- गर्भपाताचा दर आणि गर्भपातामुळे होणारे आजार यांचा सविस्तर अभ्यास करणे.
- स्त्रियांचे आरोग्याचे प्रश्न व आरोग्याची काळजी घेण्याबाबत असणारी स्त्रियांची मानसिकता याचा विश्लेषणात्मक अभ्यास करणे.

## संशोधनाची मुख्य उद्दिष्ट्ये :

1. गर्भपाताच्या प्रमाणाचा अंदाज घेणे.
   - 15-49 या वयातील ज्या स्त्रियांचा एकदा गर्भपात झाला आहे, अशा स्त्रियांचे समाजातील प्रमाण अभ्यासणे.
   - नैसर्गिक आणि कृत्रिम गर्भपाताच्या सरासरी प्रमाणाचा अंदाज घेणे.
   - स्त्रीच्या आयुष्यातील गर्भपाताचे सरासरी प्रमाण.
2. गर्भपात शस्त्रक्रियेमुळे होणाऱ्या आजारांचे प्रमाण व स्वरूप यांचा अभ्यास करणे.
3. गर्भपात करण्यामागील कारणे व त्यांचे बदलत्या परिस्थिती संदर्भात विश्लेषण करणे.
4. भारतातील सामाजिक परिस्थिती व स्त्रियांची गर्भपाताची गरज यांचा एकत्रित अभ्यास करणे.
5. गर्भपात शस्त्रक्रिया सेवेसाठी स्त्रिया वैद्यकीय तज्ञांची निवड करताना कोणते निकष वापरतात.
6. गर्भपातासाठी स्त्रीने आणि/ किंवा तिच्या कुटुंबियांनी, मित्रवर्गीयांनी केलेला खर्च (प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष)

## हा अभ्यास करण्यामागील कारणे:

1. या अभ्यासामुळे गर्भपाताच्या प्रमाणाची योग्य माहिती मिळवून त्या माहितीचा धोरणे तयार करताना उपयोग करता येईल.
2. वेगवेगळ्या कारणास्तव वारंवार होणाऱ्या गर्भपात शस्त्रक्रियांचा स्त्रियांच्या आरोग्यावर काय व कसा परिणाम होतो हे समजून घेता येईल.
3. एकापेक्षा जास्त वेळा नैसर्गिक गर्भपात होत असल्यास त्याची कारणे स्त्रियांना होणाऱ्या आजारांचे प्रकार या माहितीवरून जाणून घेता येतील.
5. गर्भपात करण्यामागील बदलती कारणे :

   उदा. गर्भलिंग निदान चाचणी, मुलगाच हवा यावर भर, लहान कुटुंब असण्यावर भर, गर्भनिरोधकांच्या माहितीचा अभाव, इत्यादी.
6. गर्भपात शस्त्रक्रियेनंतर होणाऱ्या गुंतागुंतीतील नोंदींच्या संख्येवरून सध्या मिळणाऱ्या गर्भपात सेवेचा दर्जा आणि गर्भपातामुळे होणारे आजार यामधील सुक्ष्मसंबंध या अभ्यासातून मिळू शकेल.
7. गर्भपातामुळे कुटुंबाचा होणारा खर्च अभ्यासल्याने कुटुंबावर पडणारा अनावश्यक आर्थिक ताण आपण समजावून घेऊ शकतो. सुरक्षित/असुरक्षित/वारंवार होणाऱ्या गर्भपात शस्त्रक्रियांना खालील गोष्टी कारणीभूत असतात....
   - स्त्रियांना गर्भपात सेवा देणाऱ्या व्यक्तींबद्दल किती माहिती आहे?
   - गर्भपात सेवेची उपलब्धता, सुविधा.
   - सरकारच्या कुटुंबनियोजन सेवांनी मोफत सेवा म्हणून वापरलेल्या साधनांचा दर्जा.
   - स्त्रियांचा उत्पादक श्रमातील वाढता सहभाग त्यामुळे त्यांच्यावर पडणाऱ्या तिहेरी जबाबदाऱ्या : 1) मुलांचे संगोपन 2) घरातील स्वयंपाक-पाणी 3) उत्पादक श्रम.

**अभ्यास कशासाठी? - अन्वेषींनी तयार केलेल्या पोस्टर प्रदर्शनातून**

# अन्वेषींची मनोगते

संशोधन प्रकल्पात येण्याचे प्रत्येक मुलीचे कारण वेगवेगळे आहे. त्यांच्या या कामाकडून अपेक्षाही वेगवेगळ्या होत्या. कामाची गरज, आर्थिक अपेक्षा, मनासारखे काम करण्याची संधी यासारख्या गोष्टींचा शोध मुलींना सेहतपर्यंत घेऊन आला. प्रत्यक्ष काम सुरू झाल्यावर या अपेक्षांच्या चौकटी खुल्या झाल्या आणि मुलींच्या आकांक्षाना गती मिळाली. अन्वेषी म्हणून प्रकल्पात काम करताना मुलींना जे काही मिळाले, गवसले आणि उमजले याविषयी त्यांच्याच शब्दात.......

# एकटेपणा कमी झाला.....

सेहतमध्ये येण्यापूर्वी मी खूप ठिकाणी नोकरी केली होती. ती नोकरी म्हणजे लोक सांगतील तेवढंच काम करणं असं होतं. त्यापेक्षा वेगळं काही केलं तर बोलणी ऐकावी लागत. सेहतमधील काम लोकांबरोबर व गावात जाऊन करायचं आहे हे समजल्यानंतर खूप आनंद झालेला. बायकांच्या मुलाखती व गावातील लोकांबरोबर आरोग्य या विषयावर लोक व आपण बोलणार. म्हणजे फक्त एकानेच भाषण देणे असं काम नव्हतं हे ऐकून एकदम छान वाटलं. अशा प्रकारचे काम जमेल की नाही याची मनात भीती होती. पण हे करायला खूप आवडणारही होते.

हे काम सुरू होण्यापूर्वी मी खूप वेगवेगळ्या निराशेच्या भावभावनात होते. त्यातून बाहेर निघण्यासाठीही हा जॉब खूप छान आहे असं मला वाटत होतं. कामात गुंतल्यावर स्वतःच्या प्रश्नामधून बाहेर पडण्यास मदत होईल असं वाटत होतं. या सगळ्यात मी खूप एकटी पडली आहे, अनेक लोकांच्या संपर्कात राहिल्यानंतर एकटेपणा जाईल असं मला वाटत होतं. एक स्त्री म्हणून मी खूप वेगळं जीवन अनुभवलं होतं. आपण स्त्रियांसाठी सध्या काही करू शकत नाही. या कामामुळे त्यांच्या जवळ जाऊन त्यांच्याशी थोडसं बोलून त्याचं मन तरी हलकं करू शकतो, असं वाटत होतं. एक स्त्री म्हणून काहीतरी बोलल्यानंतर ते ऐकून घ्यायला कोणीतरी व्यक्ती असेल तर किती बरं वाटत याचा मला स्वतःला अनुभव होता. यातूनच बायकांशी बोलणं होणं किंवा त्या जे बोलतात ते ऐकून घेणं आवश्यक आहे असं वाटत होतं. यात स्वतःचा स्वार्थ म्हणजे प्रश्नांच्या जंजाळातून स्वतःला बाहेर काढून आपल्याबरोबर अनेक स्त्रियांना निदान मार्ग शोधायला प्रवृत्त करू शकतो असं वाटत होतं. माझं शिक्षण वाणिज्य शाखेतून झालेलं आहे. आता सेहतचा जॉब संपल्यानंतर मी पुन्हा वाणिज्य शाखेमध्ये जॉब करेन की नाही याची मला शंकाच वाटते. यापुढेही मला लोकांमध्ये राहून काम करायला खूप आवडेल.

**.....सुनिता**

# स्वतंत्र जगण्यासाठी.....

माझं दहावीपर्यंत शिक्षण ग्रामीण भागात झालं होतं. त्यानंतर स्वतःचं शिक्षण स्वतः काम करून चालू ठेवायचं असा निर्णय घेतला होता. वसतिगृहात राहून मी काम करून बी.ए. पूर्ण केलं. यापुढेही स्वतः नोकरी करून पुढे एम. ए. करावे, दुसऱ्यावर अवलंबून राहू नये, असं सतत वाटत होतं. आईकडे जाऊन पुन्हा घरात अडकायचे नव्हतं. काही व्यक्तीचे अनुभव जवळून पाहिले व ऐकलेही होते, की लग्नानंतर किती अडचणी येतात, म्हणून निर्णय घेत होते की लगेच लग्न करायचं नाही. त्यासाठी सतत संघर्ष करावा लागत असे. सेहतमध्ये नोकरी लागल्यानं अनेक अडचणी दूर झाल्या व त्यातून मला नोकरी करून स्वतंत्र जगताही आलं. सेहतचं काम हे संपूर्ण महाराष्ट्रात होतं, व मला फिरायलाही मिळणार होतं. म्हणून जास्त आनंद झाला. कामही असं की स्त्रियांच्या मुलाखती घेणे, त्यामुळे मी सेहतमध्ये काम करण्याचा निर्णय घेतला.

**.....ज्योती**

# शिकलो त्याचं मोल पैशांपेक्षाही जास्त.....

माझं बालपण म्हणजे एकदम बिकट परिस्थितीतलं. वडील सोडून गेल्यामुळे आमच्या चार भावंडाचा भार आईवर पडला. खूप कठीण परिस्थितीतून तिनं आम्हाला वाढवलं. आमच्या वस्तीतील म्हणजे येरवडा भागातील वातावरण चांगलं नसल्यामुळं आईनं मला पाचवीला आणि बहीणीला पहिलीला हॉस्टेलला घातलं. हॉस्टेलमध्ये शिकताना खूप वाईट वाटायचं. आपल्या परिस्थितीमुळे आपल्याला इथं यावं लागलं. आई आणि भाऊ जमेल ते काम करू लागले. गरिबी किती वाईट असते, याचे चांगलेच दर्शन घडत गेले. अभ्यासात पास होण्याइतपत मार्क्स मिळत. आपण कोण व्हायचं? पुढे काय करायचं? याबद्दल विचार सततच बदलत असायचे. मनात यायचं खूप कष्ट करायचे आणि भरपूर पैसा मिळवायचा. अभ्यास सोडून सर्व कामात कष्ट करायला मला खूप आवडायचं. योगायोगानं सिनियर कॉलेजला मी एनसीसी मध्ये भाग घेतला. एनसीसीचे ध्येय म्हणजे २६ जानेवारीला दिल्ली येथे होणाऱ्या कार्यक्रमासाठी जायचे. मनात एक जिद्द निर्माण झाली की आपण दिल्लीच्या कार्यक्रमासाठी जायचंच. सलग दोन वर्ष दिल्लीसाठी प्रयत्न करत असताना केवळ चेहरा महाराष्ट्रीयन नसल्या कारण्याने मला काढून टाकण्यात आलं. पण एनसीसीमुळे शिस्तबद्धता आणि मेहनत याची सवयच जडली आणि ठरवलं आपण आर्मी मध्ये भरती व्हायचं. देशाची सेवा होईल आणि आपल्या आवडीची नोकरी ही मिळेल. या विचाराने मी तिसऱ्यावर्षीही दिल्लीसाठी प्रयत्न केला. अनेक कसरतीनंतर माझी निवड झाली. तो आनंद! त्या आनंदात मी नेहमीच जगत राहीन. माझं एनसीसी आणि कॉलेज संपतय तोच 'सेहत' ची जाहिरात आमच्या कॉलेजमध्ये लागली. पगार पाहून तर खूपच आश्चर्य वाटलं. ६ महिन्याच्या नोकरीत आपण साधारण ३०,०००/- कमवू! घरच्यांना ही किती आनंद होईल! केवढा मोठ्ठा हातभार घराला लागेल! घरात एवढा पगार तर आत्तापर्यंत कोणालाच नाही. शिवाय माझी ही पहिलीच नोकरी. या विचारानेच माझ्या मनाला ही जाहिरात वेड लावून गेली. घरच्यांची परवानगी न घेताच सेहतमध्ये अर्ज द्यायचं ठरवलं. आम्ही ७-८ मैत्रिणींनी अर्ज दिले. हॉस्टेल मधून बाहेर सोडत नसल्याने आमचा 'निरोप्या' निलिमा होती. तिनंच आमचे अर्ज ऑफीसमध्ये पोहचविले. आम्हाला निरोप दिले. इंटरव्ह्यूसाठी नेलं. सेहतमध्ये काम मिळवून देण्याच श्रेय तिलाच. या कामाच्या जाहिरातीमुळे माझ्या अभ्यासावर काहीसा परिणाम झालाच. अश्विनी आणि मी एकत्र अभ्यासाला जायचो. तिथं गेल्यावर आमचा एकच विषय म्हणजे 'सेहतची नोकरी'. इंटरव्ह्यू मध्ये पास होऊ का? ६ महिन्यात ३०,०००....? माहीत असायचं एवढा पगार, तरीही महिन्यांचा आणि पगाराचा हिशोब वहीच्या मागच्या पानावर करायचो आणि खूप आनंदून जायचो. सेहतमध्ये येण्यापूर्वीचे हे विचार आठवून आज मजा वाटते. हसूही येतं. इथं जे मिळालं, जे शिकलो त्याचं मोल या पैशांपेक्षा कितीतरी जास्त आहे. या वयात आपला प्रदेश, त्यातील लोक यांना भेटण्याचं, जिवंत शिक्षण लाभलं. ते पुढच्या आयुष्याला वळण लावणारं ठरलं.

**..... शकुंतला**

# पुस्तकाबाहेरचं ज्ञान मिळालं.....

सेहत मधील नोकरी हा माझ्या आयुष्यातील नोकरीचा पहिलाच अनुभव. त्या अगोदर खेडेगावात १० वी पर्यंत शिक्षण झालं आणि त्यानंतर वसतिगृहात बी. ए. पर्यंत शिक्षण पूर्ण झालं. वसतिगृहात असतानाच सेहतमधील कामाविषयी माहिती मिळाली. त्यावेळेस नोकरी वगैरे करण्याचा असा माझा कोणताही विचार नव्हता, परंतु कॉलेज संपल्यानंतर घरी गेल्यावर काय करावं हा प्रश्न होता. गावाकडं एकदा घरी राहिल्यावर पुन्हा बाहेर पडणं फारच कठीण असतं. पुण्यात जरी पाच वर्षे राहिले असले तरी मला पुणे स्टेशन सोडून दुसरा कोणताही स्टॉप माहिती नव्हता. शिवाय घरी फक्त स्वंयपाक, पाणी हेच करत राहताना किती त्रास होतो हे मी सहा सात महिने अनुभवलं होतं. त्यामुळे काहीतरी करायचे घराबाहेर पडायचे हे पक्कं होतं. नोकरी करण्यासाठी पालकांची सहजासहजी परवानगी मिळणं कठीण होतं. तीही जबाबदारी मैत्रिणींनी घेतली. ज्या वेळेस आमच्या मुलाखती झाल्या ते दिवस परीक्षेचे होते. कशाला जायचे? मला घेणारंच नाहीत, असंच मला वाटत होतं. कदाचित मी तेव्हा आले नसते तर आज माझ्या जवळ पुस्तकातील चार गोष्टी शिवाय काहीच ज्ञान नसतं. आणि ते ज्ञान तरी मी कुणाला सांगितलं असतं?, जर मला इथल्यासारख्या मैत्रिणी मिळाल्या नसत्या. गर्भपात या प्रकल्पात काम करणाऱ्या मुली ह्या वेगवेगळ्या क्षेत्रातून आलेल्या. आम्ही एकमेकींना ओळखतही नव्हतो. या प्रकल्पात सर्व एकत्र येऊन काम करणार, दुसऱ्या अनोळखी गावी जाणार, बरोबर घरचं कोणीच नसणार. तसंच बऱ्याच मुली पहिल्यांदाच एकट्याने घराबाहेर पडणार होत्या. त्यामुळे सर्व मुलींची एकमेकींशी चांगली ओळख व्हावी. त्यांचे विचार, मतं समजल्या नंतर एकत्र राहणं काम करणं सोपं जाईल. तसेच ज्या संस्थेत आपण काम करतो त्याचीही पूर्ण ओळख होईल.

या प्रशिक्षणाआधी म्हणजे पहिल्या दिवशी आम्ही एखाद्या हाताप्रमाणे होतो. म्हणजे हात आपला, परंतु त्यांची बोटे सुटी सुटी आणि पाच प्रकारची. परंतु आता आम्ही एक आहोत अस वाटतं. ही एकतेची मूठ प्रशिक्षणातील सहवासानं बनवली आहे. ती पुढील सहा महिने अशीच रहावी, अशी मी प्रार्थना करते.

.....**सविता**

# लोकजीवनाच्या जवळ जाण्याची संधी.....

आतापर्यंतचा बराचसा जीवनक्रम हॉस्टेलमध्ये गेल्यामुळे वेगवेगळ्या गावातून आलेल्या वेगवेगळ्या सामाजिक, आर्थिक परिस्थिती असलेल्या मुलींच्या सहवासात राहून वेळ प्रसंगी एकमेकांची सुख दुःखं वाटून घेण्याची सवय लागली होती. त्यामध्ये एकमेकांच्या उपयोगी पडल्याचा आनंदही वाटत असे. परंतु त्याच वेळी काही प्रसंग, काही परिस्थिती मनाला टोचून जायची. प्रश्न पडत असे की 'असे का?' ह्या पडलेल्या प्रश्नांची उत्तरे शोधण्याची उत्सुकता वाटायची. यातूनच सामाजिक परिस्थितीचा, सामाजिक समस्यांचा अभ्यास करण्याची आवड निर्माण झाली. व या आवडीतूनच ग्रॅज्युएशनला समाजशास्त्र हा विषय निवडला व नंतर एमएसडब्ल्यू पूर्ण केलं.

सेहतमध्ये रूजू झाल्यानंतर ट्रेनिंगच्या कालावधीत कामाची पद्धत, दबावमुक्त वातावरण, कामाचा विषय हे सर्व खूप आवडलं. मनापासून प्रामाणिकपणे काम करण्याची उमेद निर्माण झाली. लिस्टींगसारखी जबाबदारी अचानक स्वीकारावी लागली. त्यामध्ध कष्ट भरपूर आहेत हेही माहीत होतं. तरी देखील खूप आनंदानं ही जबाबदारी मी स्वतः तरी स्वीकारली होती. कारण सेहतमध्ये रूजू होतानाच मनाशी ठरवलं होतं की ह्या जॉबकडे नुसती पैशासाठी नोकरी असं न पाहता आपल्याला जे काही नवीन शिकायला मिळेल ते शिकायचं.

प्रकल्पामध्ये काम करत असताना लोकजीवनाच्या खूपच जवळ गेले व जवळ जाऊन लोकजीवन अभ्यासण्याची संधी मिळाली. स्त्रीला जर संधी मिळाली तरच ती स्वतःच्या पायावर उभी राहू शकेल. त्यामुळे कदाचित तिच्यावरचा अन्याय अत्याचार कमी होण्यास मदत होईल. स्वतःचा निर्णय ती स्वतः घेऊ शकेल आणि मग 'मुलगी म्हणजे ओझं' असं आई वडिलांना वाटणार नाही, मुलीची भ्रूणहत्या होणार नाही.

**.....संध्या**

# विचारांना चालना मिळाली.....

साचेबंद कामापेक्षा टीमवर्क हे कधीही चांगलंच. त्याचप्रमाणे ग्रुप सोबत काम करताना खूपच बरं वाटत आहे. एम.एस.डब्ल्यू. नंतर लगेचच सेहतमध्ये कामाची संधी मिळाली. ही सर्वात आनंदाची बाब कारण एमएसडब्ल्यू नंतर कुठे नोकरी शोधायची हा मोठा प्रश्न होता. पण सेहत मधील कामाची संधी ही चांगलीच गोष्ट आहे.
साचेबंद कामामध्ये/कोणत्याही नोकरीमध्ये आपण कामाला सुरुवात करतो तेव्हा एक प्रकारचे दडपण असते. पण इथं आयुष्यातील नोकरीचा पहिला दिवस असूनही कोणत्याच प्रकारःचे दडपण आले नाही. काम करीत असताना, प्रशिक्षणामध्ये आपण जे जे काही शिकत गेलो त्याच्यामधून गर्भपाताच्या आर्थिक, सामाजिक, राजकीय अंगांचा विचार करता आला.

गटामध्ये आम्ही सर्वच मुली त्यामुळे काम करताना खूपच मजा येत असे. ग्रुप वर्क मधून नवनवीन विचारांना चालना मिळते. विचार करण्याच्या अनेक संधी येथे मिळत आहेत. अनेक मुलींचे स्वभाव, त्यांच्या कल्पना, विचार समजले. ग्रुप मधील सर्व मुलींचे विचार ऐकून त्या सर्वांमध्ये कित्येकदा स्वतःचे रूप दिसून आले.

**......दर्शना**

# चर्चा करण्याचं, बोलण्याचं धाडस.....

या गटात एकत्र आल्यामुळे मला नविन मैत्रिणी मिळाल्या. फारच महत्त्वाची गोष्ट म्हणजे चर्चा करण्याचं, बोलण्याचे थोडं थोडं धाडस करायला लागले. बाहेरच्या जगाचा काहीही अनुभव नसताना मला पहिल्यांदा काम करण्याची चांगली संधी दिली गेली. आतापर्यंत ज्या गोष्टी मला माहिती नव्हत्या त्या माहिती झाल्या. आपल्या शरीराची उत्कृष्ट ओळख झाली. शाळेमध्ये असताना शास्त्र या विषयात प्रत्येक अवयवाची इतकी चांगली माहिती मिळाली नव्हती. पण आता फारच छान माहिती मिळाली. शिवाय औषधांची आपल्या शरीराला किती गरज असते, त्यात आपल्या मानसिक स्थितीचा किती समावेश असतो. याची सविस्तर माहिती मिळाली. मुख्य गोष्ट म्हणजे, मला येथे समजणार नाही अशा पद्धतीने काहीही सांगितलं जात नाही. त्यातूनही काही समजलं नाही तरीही मला पुन्हा समजावून सांगण्यास कोणीही नकार देत नाहीत. एखादा शब्द अडला तरी ही तो शब्द मला सोप्या भाषेत समजून सांगण्याचा प्रयत्न केला जातो. त्यामुळे इथं समजत नाही असं काहीही होत नाही. या गटात जी महत्त्वाची चांगली माहिती मिळाली त्याचा मला माझ्या भावी जीवनात फारच चांगला उपयोग होईल. शिवाय ह्या माहितीचा मी प्रसार करण्याचा प्रयत्न करेन.

**.....प्रमिला**

# नवी ठिकाणं!, नवी माणसं !! .....

मी सर्वसाधारण गरीब कुटुंबातून आलेली आहे. माझं शिक्षण 'कमवा-शिका' योजनेतून झालं. इथं येण्यासाठी कारण घडलं, मी एस.वाय.ला असताना माझे वडील वारले. त्यानंतर घराची आर्थिक जबाबदारी मोठी या नात्याने माझ्यावर होती. आईची मानसिक स्थिती पाहता आपण नोकरी करावी असा विचार केला.

जेव्हा कामाचं स्वरूप समजावून घेतलं, तेव्हा बरं वाटलं. कारण काम एकाच जागी नव्हतं. वेगवेगळी ठिकाणं, विभाग, नविन अनुभव घ्यायला, शिकायला मिळणार होते. शिवाय असाही विचार मनात आला, वेगवेगळ्या ठिकाणी जाऊन लोकांचं जीवन जवळून अनुभवायला परत अशी संधी मिळणार नाही! असं ऐकलं होतं इथं १२ मैलावर भाषा बदलते. भाषा बदलते तर साहजिकच जीवनमान पण बदलतं. आणि वेगवेगळ्या स्तरातले जातीपंथातले आणखी वेगळ्या स्वभावाचे लोक भेटणार होते. आयुष्याच्या प्रत्येक क्षणी नविन शिकण्याची संधी होती. त्याच्याबरोबर काही वेळ तिथे रहायचं होतं. म्हणजे त्या प्रत्येक परिस्थितीशी जमवून घ्यायचं होतं. जे रोज जगतो त्या आयुष्यात शक्य नाही अशा गोष्टी आम्ही करणार होतो. अशा सगळ्याच दृष्टिकोनातून ही नोकरी स्वीकारली.

**.....तृप्ती**

# मनस्थिती सुधारण्यासाठी.....

मी मुळातच अबोल आहे. मला कितीही त्रास झाला तरी स्वतः त्याविषयी तक्रार न करणे हा माझा स्वभाव. लहानपणापासूनच घर ते शाळा व मग कॉलेज असंच जीवन चालू होतं. घरच्यांना मी नोकरी करणं मुळीच पसंत नव्हतं. त्यामुळे शिक्षण आणि मौजमजा करणं एवढंच फक्त जीवन होतं. बी.कॉम. झाल्यावर लग्न झालं आणि सगळं जीवन बदललं.

लग्नानंतर काही दिवसातच नवऱ्याची लायकी समजली. पण समाजाच्या लाजे पोटी त्याच्या घरी राहत होते. एक दिवस मात्र असह्य होऊन माझ्या घरच्यांना सर्व सांगितलं व पुन्हा त्या घरी न जाण्याचा निर्णय घेतला. पण दुर्दैव माझ्या पाठी लागले. मी माहेरी आल्यावर मला दिवस गेल्याचं जाणवलं. सगळ्यांना आनंद झाला होता. मुलानंतर तरी जावई चांगला राहील अशी त्यांची खुळी समजूत झालेली व सगळ्यांच्या हट्टापोटी ते मूल राहिलं गेलं.

मुलगी झाल्यानंतर मी माझं दुःख विसरून 'आई' या नवीन नात्याची जपणूक करायला लागले. काही वर्षानंतर जाणवलं, आता आपल्याला स्वतःच्या कमाईची गरज आहे. त्याकरता नोकरीचा विचार घरच्यांपुढे मांडला, सगळ्यांनी त्यास होकार दिला. मग मी जवळच असलेल्या एका पतसंस्थेमध्ये क्लार्क म्हणून कामास सुरुवात केली. जवळ जवळ चार वर्षे सहज गेली, पण कामात मन लागत नव्हते. पगार ही व्यवस्थित नव्हता. मी आमच्या ओळखीच्या बऱ्याच जणांना सांगून ठेवलेलं होतं. अशावेळी कागद काच पत्रा संघटनेत काम करणाऱ्या आमच्या येथे रहाणाऱ्या बाई माझ्याकडे आल्या, नि सेहतच्या प्रोजेक्ट विषयी मला सांगितलं. मुलाखतीसाठी जाण्यासाठीही मला भाग पाडले. कामासाठी सहा महिने मुलीला सोडून जायचे याची कल्पनाच मला सहन होत नव्हती. 'तुझी मनस्थिती सुधारेल, तू जा!' असा त्यांनी आग्रह केला, मला पटलं. मी आईच्या व त्यांच्या सांगण्यावरून संस्थेत आले व जॉईन झाले.

**.....प्रभा**

# भीती गेली, आत्मविश्वास वाढला.....

महर्षी कर्वे स्त्री शिक्षण संस्थेत बी.ए. पर्यंत संस्थेच्या स्वंयपाकघरात काम करून मी शिकले. स्वतःची वैयक्तिक अडचण असल्याने मी शिकत होते. पण ही अडचणच मला फार काही देऊन, शिकवून गेली. स्वतःचं शिक्षण स्वतः पूर्ण करायचं असल्यानं मला बी.ए.ला असतानाच वाटत होतं की, आता इथून संस्थेतून बाहेर पडल्यानंतर काय करायचं? कुठे रहायचं? शिक्षण कसं पूर्ण करायचे? या प्रकारचे बरेच प्रश्न मला होते. कॉलेजच्या शेवटच्या वर्षी अगदी परिक्षेच्या काळात 'सेहतची' नोटीस लागली होती. कॉलेज मधील मैत्रिणीच्या सहकार्यातून 'सेहत' संस्थेकडे मी माझा नोकरीसाठी अर्ज केला. माझ्या दृष्टीने ही एक आनंददायी घटना माझ्या आयुष्याला वेगळीच कलाटणी देणारी ठरली. स्वतःचे शिक्षण पूर्ण करण्यासाठी, बऱ्याच काही गोष्टी शिकण्यासाठी, स्वतःचा आत्मविश्वास वाढवण्यासाठी मी 'सेहत' मध्ये आले होते. तसेच मला कोणाचीही मदत नको होती. आपण कष्ट करून आपल्या कष्टाचे मोल मला हवे होते.

प्रशिक्षणाचे दिवस खूप मजेत गेले. गटातील रोजची चर्चा, तसेच प्रत्येक दिवशी वेगवेगळ्या व्यक्तिकडून उत्कृष्ट पद्धतीने व्याख्यान, यातून असं वाटायचं की, रोजच्या रगाड्यातून आपण जरा वेगळ्याच विश्वात आलो आहोत. कितीतरी गोष्टींची आपल्याला माहिती नव्हती. ती इथं आल्यानंतर मिळाली. तसेच रोज काहीतरी अभ्यास किंवा प्रत्येक वेळी वेगवेगळ्या मुलींच्या ग्रुपमधून चर्चा, चर्चा झाल्यानंतर सादरीकरण, आणि विषयानुसार पोस्टर तयार करणं. हे सर्व करताना खूप मजा वाटायची आणि आनंदही व्हायचा.

गटात बोलताना कधी-कधी माझा थरकाप व्हायचा कारण मी कधीच अशा कार्यक्रमात सहभागी झालेली नव्हते. त्यामुळे असे वाटायचे की आपलं काही चुकतं की काय? अशी भीती वाटायची. त्यामुळे मला माझ्यात काही तरी कमी आहे असंच वाटायचं. पण दर्शनाला मी हे सांगितल्यानंतर तिनं मला खूप धीर दिला, समजाऊन सांगितलं. शकुही मला नेहमीच समजाऊन सांगत असे. त्यामुळं माझी भीती हळूहळू कमी झाली.

**.....वैशाली सा.**

# मोलाचा अनुभव.....

मी परिचारिकेची पदवी घेतली खरी. पण परिचारिकेच्या नोकरीची संधी बाजूला ठेवून त्याच पदवीच्या आधारावर योगायोगाने आरोग्यशास्त्र या विषयातील पदव्युत्तर शिक्षणासाठी पुणे विद्यापीठात प्रवेश मिळवला. तो अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर ज्या नोकरीच्या संधी मिळत गेल्या, त्यातून मिळालेले अनुभव हे स्त्रियांच्या आरोग्याविषयांच्या समस्यांशी निगडित होते.

माझ्या शिक्षणादरम्यान, स्त्रियांच्या आजारांवर स्वतंत्र अभ्यास झालेला होताच. त्यानंतर, नोकरी करताना 'स्त्रियांच्या व्यवसायासंदर्भातील आरोग्यविषयक समस्या' या विषयाच्या प्रकल्पावर काम करण्याची संधी मिळाली. याच दरम्यान, 'सेहत' मधील गर्भपात विषयक अभ्यास प्रकल्पाविषयी माहिती मिळाली.

खरं तर, जेव्हा शिकत होते, तेव्हा आम्ही 'सेहत' या संस्थेबद्दल नेहमी ऐकायचो व त्यामुळे अशा संस्थेमध्ये काम करायला मिळावे अशी मी इच्छा बाळगून होते. म्हणूनच जेव्हा कळले की सेहतमध्ये अनुभव घेण्याची संधी आहे त्यावेळी मी लगेच संपर्क साधला व माझी इच्छा पूर्ण झाली. सेहतच्या ज्या प्रकल्पाशी मी संबंधित होते. त्याचा विषय ही माझ्या आवडीचा होता. त्याचबरोबर हा अभ्यास प्रकल्प मोठ्या प्रमाणात राबविला जाणार असल्याचे कळल्यामुळे असा अनुभव मिळणे देखील फार मोलाचे वाटले. ज्या क्षेत्रात आपण काम करण्याचे ठरवितो, त्यामध्ये सरस अनुभव मिळावा, या इच्छेने काम करण्याचे मी ठरविले. मला या प्रोजेक्टसाठी अल्प-स्वल्प योगदान देण्याची संधी मिळाली याचे मला समाधान आहे. मला मुळातच, सर्वांबरोबर मिळून-मिसळून काम करण्याची तसेच प्रवासाची आवड असल्यामुळे प्रोजेक्टवर काम करण्यात मला अडचण आली नसावी असे वाटते.

**.....गार्गी**

# घराला हातभार लावायचा होता.....

प्रत्येक मुलीच्या आकांक्षा असतात जीवनात काही तरी करून दाखविलं पाहिजे. स्वतः स्वतःच्या पायावर उभं राहिलं पाहिजे. सर्वांप्रमाणे माझ्याही याच अपेक्षा होत्या. परंतु माझ्या घरची परिस्थिती ठीक नव्हती. वडील नसल्यामुळे सारखं मनात वाटत होतं की आईनी इतक्या कष्टातून वाढवलं शिक्षण पूर्ण केलं त्याचे उपकार फेडणं तर अशक्यच आहे. त्यातल्या त्यात हे काम करून तीळभर जरी माझ्याकडून आईला मदत झाली तर मी माझे भाग्य समजते. हेच कारण आहे मी एवढे हार्ड वर्क असूनसुद्धा शेवटपर्यंत हे काम करताना समर्थ राहिले, टिकून राहिले.

.....**पुष्पा**

# प्रश्न विचारायची सवय लागली.....

ट्रेनिंग! ट्रेनिंग!! ट्रेनिंग!!! 'ट्रेनिंग' हा शब्द मुलाखत झाल्यापासून सारखाच ऐकत होते. असं वाटायचं हे ट्रेनिंग म्हणजे असणार तरी काय? सुरुवातीला असं वाटायचं ट्रेनिंग म्हणजे नुसती प्रश्नावली कशी भरायची, तसंच लोकांना कसे व कोणत्या प्रकारचे प्रश्न विचारायचे ही माहिती देणार, ज्यावेळेस खऱ्या अर्थाने प्रशिक्षणाला सुरुवात झाली त्यावेळेस कळलं की प्रशिक्षण म्हणजे नुसतंच शिकण नसून ते खऱ्या अर्थाने स्वतःला परिपक्व करणं आहे. ज्यावेळेस जनजागृती करायची असते त्यावेळेस नुसतं लोकांना जागृत करायचं नसून आपण स्वतः सर्व अर्थाने जागृत झालेलो असलो पाहिजे. ते काम या प्रशिक्षणामधून साधलं गेलं. आमचे जे समज, गैरसमज आहेत ते अनेक तज्ञ मंडळींच्या साह्याने दूर करुन आम्हाला खऱ्या अर्थानं जागृत करण्याचे काम या प्रशिक्षणाने व सेहत या संस्थेने केलं.

केवळ गर्भपात या विषयाचं ज्ञान देण्याचा प्रयत्न ट्रेनिंगमधून केला जात नाही, तर त्या विषयी असणारे कायदे, स्त्रियांची शारीरिक माहिती, शरीराची ओळख, गर्भधारणा कशी होते, तसेच मासिक पाळी कशी व वयाच्या कितव्या वर्षी येते, गर्भपातासंबंधी विविध साधने, त्याच्या पध्दती, गर्भपात रोखण्यासंबंधी विविध उपाय, व त्यांना आळा घालण्यासाठी विविध उपाय, उपकरणे त्यासंबंधी असणारे कायदे या संबंधी सर्व ज्ञान व माहिती अनेक तज्ञ व डॉक्टर मंडळींच्या साह्याने या प्रशिक्षणामधून देण्याचा प्रयत्न केला.

एवढंच नव्हे तर एखाद्या गावात गेल्यावर कोणत्या प्रकारच्या अडचणी येतील व त्या आपण कशा प्रकारे सोडवल्या पाहिजेत. आपलं वर्तन कसं असलं पाहिजे. आपण त्या गावातील व्यक्तिंशी कशाप्रकारे वागलं, बोललं पाहिजे, या गोष्टीही या प्रशिक्षणामधून आम्हाला शिकवल्या. प्रशिक्षणामधून आम्हाला प्रश्न विचारायची सवय लागली. एवढ्या मोठ्या गटांमध्ये कसं बोलायचं याची सवय व धैर्य आमच्यामध्ये निर्माण करण्याचा या प्रशिक्षणामध्ये प्रयत्न केला. एकूणच या संस्थेचे व प्रशिक्षणाचे उद्दिष्ट इतकं महत्त्वाचं, आहे की फील्डवर गेल्यावर नक्कीच त्याचा आम्हाला उपयोग झाला एवढंच नव्हे तर आयुष्याच्या प्रत्येक वाटेवर त्याचा मला उपयोग होणार आहे. **.....अश्विनी**

# आपलेपणाचं काम.....

स्वतःची ओळख करून द्यायची म्हणजे माझ्यापुढे मोठे प्रश्नचिन्ह उभे राहते. मी सध्या एफ.वाय.बी.ए. ची परीक्षा दिलेली आहे. आणि आता सध्या घरातच असते. घरात आई-वडिलांना टेलरींग कामात थोडीफार मदत करते. घरातली परिस्थिती इतकीशी काही व्यवस्थित नाही. म्हणजे आमच्या घरात धार्मिक, विधायक असे वातावरण असल्यामुळे सर्वजण समजूतदार आणि मनमोकळे आहेत. तसाच माझा स्वभाव आहे. एखाद्याशी मैत्री केली तर ती शेवटपर्यंत आठवणीत ठेवायची. मैत्रीचा विकास करणे, मला फार आवडते. मैत्रिणी करायला आवडते. सध्या मी बौद्ध धर्माचे वर्ग करते. आणि स्वतःचा विकास करण्याचा प्रयत्न करते. त्याचप्रमाणे घरात आर्थिक अडचण असल्यामुळे त्याचे मार्ग शोधण्याचे विचार सतत करत असते. आणि त्यादृष्टीने काम शोधण्याचा प्रयत्न करते. अचानक सेहतबद्दल कळले आणि त्या कामाचे स्वरूप कळल्यानंतर फार आनंद झाला. पहिल्यापासून फिरायची आवड होती. त्यामुळे काम करण्याची तयारी केली. वडिलांनी देखील परवानगी दिली. त्याचबरोबर आर्थिक अडचणी या सर्वातून बाहेर येण्याचा उपाय म्हणून मी हे काम स्वीकारले आणि सेहतला आपलंस केलं. प्रथमतः चांगल्या पगाराची अशी ही संधी होती आणि काही तरी नवीन अनुभव येतील, या दृष्टीने सेहत मध्ये कामाला लागले. परंतु कामाला लागल्यानंतर माझी जबाबदारी वाढली. प्रत्येक वेळी विचार करून बोलण्याची सवय लागली आणि बोललं तरी परखड बोलणं हेच महत्त्वाचं, हेही समजलं. सेहतला पूर्णपणे आपलंस केल्यामुळे आपलेपणानं काम करण्याची सवय झाली. काम संपल्यानंतरही जबाबदारी वाढली. कारण माझ्या कामामुळे घराला जो हातभार लागत होता, तो थांबला, असं वाटलं. खूप काही बदल झाले. येथे आल्यानंतर नवीन मुलींशी ओळख झाली त्यांच्याबरोबर एकत्र काम करण्याचा अनुभव आला. त्यांच्याशी मैत्री झाली आणि एकप्रकारे घरापासून दूर राहून इतरांमध्ये आपली आणि आपल्या सोबती असलेल्या मैत्रिणींची काळजी घेणं हे यातून शिकले.

**.....जागृती**

# काय शिकलो ?

स्वतः एक स्त्री आहोत व स्वतः जे काम करणार आहोत त्याची प्रथमतः आपल्याला सर्व माहिती हवी. - ज्योती

सखोलतेनं प्रत्येक मुद्दा समजाऊन देण्याची पद्धत. - गार्गी

स्त्री प्रथम एक व्यक्ती आहे आणि म्हणून तिनं स्वतःच्या आरोग्याकडे लक्ष देणे आवश्यक आहे. - दर्शना

गर्भपाताबद्दल सखोल आणि शास्त्रीय माहिती कळली.

आपण हे काम शेवटपर्यंत करू असा आत्मविश्वास मिळाला. - वैशाली

समाजासाठी, समाजातील समस्या सोडवण्यासाठी सतत अशा प्रकारचे काम करत राहणे हा दृष्टिकोन मिळाला. - वैशाली

स्त्रीने स्वतःच्या आरोग्याविषयी किती सावध असावे हे माहीत झाले.

मैत्रीणींच्या संख्येत भर पडली.

प्रशिक्षण हे फक्त व्याख्यानाद्वारे न देता पोस्टर्स, स्लाईड शो, चर्चा इ. द्वारे दिले जात आहे, हे जास्त आवडले.

काम करत असताना समोरची स्त्री आपल्या सारखीच आहे असे समजून तिच्या अडचणींचा विचार केला जाईल.

स्त्रीने जागरुक व शिक्षित असावे. तिने स्वतःला समजून परिस्थितीचा विचार करावा व इतरांनी तिला समजले पाहिजे. - स्मिता

गर्भपातास स्त्रीची संमती असावी, तिच्यावर जबरदस्ती होऊ नये. - तृप्ती

विवाहित जोडप्यांमध्ये सहचाऱ्याची भूमिका बळावण्याची गरज. - गार्गी

# गर्भपात स्त्री अनारोग्य जबाबदार कोण?

**गर्भपाताविषयी - अन्वेषींनी तयार केलेल्या पोस्टर प्रदर्शनातून**

## गर्भपात व गर्भपातसेवा केंद्रांसंदर्भातील महत्वाची आकडेवारी

१) बेकायदेशीर गर्भपात व कायदेशीर गर्भपात यांचे प्रमाण 8 : 1

२) नोंदणीकरण झालेली केंद्रे व नोंदणीकरण न झालेली केंद्रे यांचे प्रमाण 1 : २ ते 1 : 3

३) 1996-97 नोंदविल्या गेलेल्या शस्त्रक्रिया 5.4 लाख

४) अंदाजे 80 लाख गर्भपातांपैकी 48 लाख कृत्रिम तर 32 लाख नैसर्गिक गर्भपात.

### गर्भपात सेवेसाठी स्त्रीला होणारा खर्च

१) एका गर्भपात शस्त्रक्रियेसाठी सर्वसाधारणपणे रु. 300 ते 3000 एवढा खर्च येतो.

२) स्त्री-लिंगी गर्भचिकित्सेनंतर होणाऱ्या गर्भपातासाठी सर्वसाधारणपणे रु. 5000 पर्यंत खर्च येतो.

### गर्भपातसेवाकेंद्रात लागणाऱ्या किमान सोयींची उपलब्धता

१) 41% नोंदणीकृत गर्भपात केंद्रामध्ये एका वेळेस किमान अत्यावश्यक सुविधा उपलब्ध नव्हत्या

२) गर्भपात केंद्रामध्ये पुरेशी साधनसामुग्री नसे की जीव वाचविण्याची . . . व मूल केंद्राची यंत्रणा अस्तित्वात नव्हती

३) 57.7% शहरी गर्भपात केंद्रामध्ये प्रशिक्षित वैद्यकिय तज्ञ व प्रशिक्षित मूलतज्ञ होते.

# गर्भपात समज: पूर्वी आणि आता

गर्भपात हा नाजूक विषय. या विषयाभोवती गुप्ततेचं वलय आहे आणि तथाकथित नैतिकतेचेही. गर्भपाताला अनेक पैलू आहेत. आरोग्यविषयक, कौटुंबिक, सामाजिक, आर्थिक, वैद्यकीय, कायदेविषयक आणि रूढ नीतीमत्तेचेही. आणि या साऱ्या घटकांच्या गुंतागुंतीत ज्या स्त्रीला गर्भपाताला सामोरे जावे लागते तिचा विचार फार कमी वेळा होताना दिसतो. या समाजाच्या धारणेचा प्रभाव प्रकल्पात सहभागी होणाऱ्या मुलींच्या मनावरही होताच. प्रशिक्षण, चर्चा आणि सर्वेक्षणाच्या कामात प्रत्यक्ष लोकांशी बोलून मात्र हा सामाजिक पगडा सैलावला. समज बदलली. गर्भपाताविषयी अधिक खुल्या आणि मानवी विचारांची दिशा सापडली.............

# गर्भपात समजः पूर्वी

गर्भपात एका दृष्टिकोनातून हितकारक आहे कारण त्यामुळे वाढत्या लोकसंख्येवर बंधन घालता येईल.

गर्भपात - स्त्रीची मानसिक कुंचबणा. - राखी

गर्भपात करून घेतलेल्या स्त्रीकडे बघण्याचा दृष्टीकोन - सहानुभूती वा तिरस्कारयुक्त. - राखी

गर्भपात म्हणजे स्त्रीच्या गर्भात वाढणाऱ्या अंकुराला वाढ पूर्ण होण्याआधीच परिक्षण करून गर्भातून नष्ट करणे. -अनघा

गर्भपाताविषयी माझे असे मत आहे की स्त्रीला गर्भपाताचा अधिकार असावा. पण ही गर्भपाताची एक बाजू झाली. दुसऱ्या बाजूने विचार केला तर गर्भपात शक्यतो करू नये. कारण नैतिकदृष्ट्या ते चुकीचे आहे. - वैशाली स.

गर्भपात म्हणजे माझ्या मते बालहत्या, त्यामुळे मी असे सांगेन की क्षुल्लक कारणासाठी गर्भपात करू नये. - जागृती

गर्भपात म्हटलं की निरपराध अजाण बालकाची हत्या केली, असं वाटतं.

गर्भपात करणारी व्यक्ती गुन्हेगार ठरते कारण जग पाहण्याच्या आधीच ती गर्भातील जीवाचा नाश करत असते. - पुष्पा

गर्भपात ही गोष्ट नैतिकतेच्या दृष्टीने वैध वाटत नाही.- अचला

गर्भपात करण्यापेक्षा गर्भधारणेच्या अगोदरच विचारपूर्वक पाऊल टाकणे आवश्यक आहे. - जागृती

गर्भपाताविषयी उघडपणे जास्त काही बोललं जात नाही. - स्मिता

गर्भपात म्हणजे स्त्रिच्या दृष्टीने घातक गोष्ट आहे. एक किंवा अधिक गर्भपात वारंवार केल्याने स्त्रियांचा प्राणसुद्धा जातो. स्त्रियांचा जीव धोक्यात घालण्यासाठी जन्माला आलेला एक शब्द म्हणजे गर्भपात. - शकु

दोन जीवाचे मिलन प्रेम असून सुद्धा नको असलेले अपत्य. - शकु

# गर्भपात समजः आता

स्त्रीला मुलगी होणार हे समजल्यावर गर्भपात करावा असं घरातल्यांकडून सांगण्यात येतं. तिनं त्यावेळेस नकार द्यावा. - ज्योती

स्त्रीला स्वतःच्या मताचा अधिकार गर्भपातामध्ये असणे आवश्यक वाटते. बरोबर वाटते. - राखी

स्त्री जात्याच सहनशील असते असे समजून तिच्यावर अती श्रम लादू नये, तिच्या आरोग्यविषयक प्रश्नांकडे दुर्लक्ष करू नये. - राखी

स्त्री अशिक्षित न रहाता तिला व्यवहारी, आर्थिक, सामाजिक गोष्टींची माहिती होणे आवश्यक आहे. ती फसवली गेली नाही पाहिजे. यासाठी तिने बाहेर पडलं पाहिजे. - स्मिता

भारतामध्ये पुरुषप्रधान संस्कृती आहे. त्यामुळे स्त्रियांना दुय्यम स्थान आहे. साहजिकच स्त्री आरोग्याकडे दुर्लक्ष केलं जातं. - अचला

अज्ञान, गरिबी इ. कारणांमुळे वैद्यकीय सुविधांचा लाभ घेतला जात नाही. - अचला

ग्रामीण भागामध्ये ८० टक्के लोक राहतात. आरोग्य-विषयक सुविधांचा अभाव - अचला

नसबंदी शस्त्रक्रियेमध्ये पुरुषांचा सहभाग वाढणे आवश्यक. - अचला

स्त्री पुरुषामध्ये पुरुषांना महत्त्वाचे स्थान दिलं जातं. स्त्रियांच्या आरोग्याकडं दुर्लक्ष केलं जातं.

स्त्री आरोग्य हा विषय एक घर, एक समाज ह्या पुरता मर्यादित नसून संपूर्ण देशाचा विषय आहे. - प्रभा

स्त्रीवर गर्भपातासाठी कशी जबरदस्ती केली जाते, हे कळले. - सरिता

स्त्रियांना आलेल्या संकटांमध्ये तिने गर्भपात करावा. मग तिथे एका जीवाची हत्या झाली तरी चालेल. पण एका जीवाची अब्रू वाचेल. - शकु

गर्भपात या विषयाबद्दल जी भीती होती ती दूर झाली. कारण गर्भपात करणे योग्य की अयोग्य हा प्रश्न नाहीसा झाला. -शकु

स्त्री आरोग्य ह्या विषयाकडे बघण्याचा एक नवीन दृष्टिकोन. - गार्गी

हा विषय उघडपणे चर्चा करता येण्यासारखा नाही. म्हणून स्त्रिया स्वतःला कितीही त्रास होत असला तरी लवकर सांगत नाही. त्यातून तिच्या जीवाला धोका निर्माण होऊ शकतो. स्त्रियांनी मिळून या विषयावर चर्चा केली तर या विषयांचे ज्ञान सर्व स्त्रियांना होऊ शकते. - अर्चना

गर्भपात कोणत्या परिस्थितीत करावा, गर्भपात कोणत्या पद्धतीने सुरक्षित होतो व कोणत्या पद्धती वापरल्याने स्त्रीला धोका आहे. - अर्चना

कोणत्याही दवाखान्यात नवऱ्याच्या सहीसाठी डॉक्टर गर्भपात अडवू शकत नाही. - पुष्पा

गर्भपाताच्या कायद्याविषयी योग्य ती माहिती असणे जरुरी आहे. कारण स्त्रियांना त्याचा फायदा घेता येईल आणि तो हक्क आपण त्यांना मिळवून द्यायचा आहे. - सरिता

'माझ्या शरीरावर माझा हक्क' या धोरणाद्वारे स्त्रीला गर्भपाताचा कायद्याने हक्क हवा आहे. - पुष्पा

'गर्भपात' या विषयावर बोलावयास शिकलो.

गर्भपात करण्याच्या ज्या अनेक चुकीच्या पद्धती आहेत, त्या सविस्तर समजल्या. - स्मिता

गर्भपात करावे की नाही हे स्त्रीने स्वतः ठरवावे. गर्भपात करण्यासाठी नवऱ्याची सही लागत नाही. - लक्ष्मी

एक स्त्री म्हणून स्त्रीच्या अडचणी जाणून घेण्याची समज मिळाली.

'आमच्या शरीरावर आमचा हक्क' या दृष्टिकोनातून प्रत्येक स्त्रीला गर्भपाताचा अधिकार असावा. - वैशाली स.

आपला समाज आपल्याला खरंच गर्भपाताचा अधिकार देतो का? - वैशाली स.

आमच्या मनातील गर्भपाताविषयीचा जो संकुचित दृष्टिकोन होता तो दूर होण्यास मदत झाली. - वैशाली

प्रत्यक्ष गावात काम करताना एखाद्या स्त्रीने गर्भपाताबाबतीत विचारल्यावर आपल्याला त्याची संपूर्ण माहिती असणं गरजेचं आहे. - ज्योती

बऱ्याचदा मुलीचा गर्भ असेल तर गर्भपात केला जातो. मुलगी आणि मुलगा असा भेद गर्भपाताच्या वेळी केला जाऊ नये. - वैशाली सा.

गर्भपात करावा की नाही हे स्त्रीनं स्वतः ठरवावे. - लक्ष्मी

गर्भपाताचे फायदे व तोटे दोन्हीही आहेत. - अनघा

गर्भपात या विषयावर पती-पत्नीचा जेवढा संबंध असतो, त्यापेक्षा डॉक्टरांची भूमिका चांगली व योग्य असणे आवश्यक आहे. कारण त्यांनीच आपल्या दवाखान्यामधून या गोष्टीला आळा घातला तर? - अनघा

नैसर्गिक गर्भपातापेक्षा खूपसे गर्भपात कृत्रिमरित्या घडवून आणले जातात हे प्रकर्षाने जाणवते. आणि याचे कारण प्रामुख्याने स्त्री गर्भाविषयी उदासीनता दिसून येते. - संध्या

वंशाला दिवा हवा म्हणून जर गर्भपात होत असतील तर ते चुकीचे आहे. - अनघा

वारंवार गर्भपात केल्यामुळे स्त्रीचे आरोग्य धोक्यात येते.

# मातृत्वाचंही कधी कधी ओझं होतं.....

'गर्भपात म्हणजेच एका गर्भाची हत्या' असा जरी वाईट अर्थ त्यामधून निघत असला तरी गर्भपात ही संकल्पना कशी स्त्री हितार्थ आहे याची कल्पना येईल.

गर्भपात करणं हे स्त्रीला कधीही मान्य नसतं, परंतु काही वेळा अशी परिस्थिती उद्‌भवते की तिला ही गोष्ट मान्य करावी लागते. कधी कधी एखाद्या बाईवर बलात्कार झाला आणि तिला ती गोष्ट समाजापासून लपवून ठेवायची असेल. परंतु दुर्दैवाने त्या संबंधामधून तिला दिवस राहिले तर ती आज एम.टी.पी. कायद्याच्या आधाराने सहज वैद्यकिय मदत मिळवू शकते. आज कोणाच्याही मदतीशिवाय ती ते करून घेऊ शकते.

या ठिकाणी मी माझे स्वतःचे उदाहरण देऊ शकते. मी एक विवाहित स्त्री आहे. परंतु काही अडचणींमुळे मी स्वेच्छेने माझ्या पती पासून वेगळी झाले. मी जेंव्हा आई वडिलांकडे आले त्या महिन्यात मला पाळी आलीच नाही. आई बरोबर डॉक्टरकडे गेल्यावर मला दिवस गेल्याचं समजलं. परंतु मला हे मूल नकोच होतं. घरी सगळ्यांना समजल्यावर 'मूल पाडू नये' असाच सगळ्यांचा सल्ला होता. सल्ला म्हणण्यापेक्षा सगळ्यांनी मला दडपणच आणलं आणि ते मूल मला राहून गेलं.

त्यावेळी हे सर्व संकटच वाटत होतं. मला एम.टी.पी. कायदाबद्दल माहितच नव्हतं. एम.टी.पी. कायद्याविषयी माहिती घेताना मी आज पूर्ण निर्धार केला आहे की, माझी परिस्थिती मी बदलू शकत नाही (मी आजच्या परिस्थितीत पण सुखी आहे पण माझ्या काही इच्छा मातृत्वाच्या ओझ्याखाली नक्कीच दाबल्या गेल्या) परंतु माझ्या सारख्या परिस्थितीमधून जाणाऱ्या स्त्रीला मी नक्कीच सल्ला देऊ शकेन आणि तिला योग्य मार्ग दाखवेन. या माझ्या उदाहरणावरून 'गर्भपात कायदा' हा स्त्रियांकरता वरदानच म्हणावे लागेल.

**....प्रभा**

# गर्भपात हा तर स्त्रीचा हक्क.....

गर्भपात ही क्रिया बरेच दिवसापासून चालत आलेली आहे. गर्भपात करणे ही क्रिया मला योग्य आहे असं पूर्वीपासून वाटतं. गर्भ हा स्त्रीच्या स्वतःच्या पोटात राहतो. मग तो तिचा स्वतःचा प्रश्न आहे असं मला वाटतं. गर्भपात करणं म्हणजे क्युरेटींग करणं किंवा पिशवी धुणे इतकं च मला माहिती होतं. गर्भपात का करतात याची मला माहिती नव्हती. गर्भपात का करतात, कशासाठी करतात आणि गर्भपात करण्याची काय कारणं असू शकतात हे प्रशिक्षणातून समजलं. खूप माहिती मिळाली. ही माहिती फक्त प्रशिक्षणापुरती मर्यादित नसून मला स्वतःसाठी तसंच समाजाला माझ्याकडून देण्याइतकी मी समजावून घेतली आहे.

गर्भपात करण्याची अनेक कारणं आहेत ती म्हणजे, जर स्त्री बलात्कारातून गरोदर राहिली तर त्या स्त्रीला गर्भपात करावा लागतो. जर स्त्रीला गर्भ नको असताना तिने गर्भनिरोधके वापरून देखील गर्भ राहिला असेल तर गर्भपात केला जातो. म्हणजेच या कारणामुळे जर स्त्रीला गर्भ राहिला तर गर्भपात करणे योग्य असतं असं म्हटलं जातं. परंतु यात स्त्रीला स्वतःचा हक्क म्हणून गर्भपात करता येत नसून त्या कारणास्तव स्त्रीला गर्भपात करून दिला जातो.

गर्भपात करणं योग्य आहे असं नेहमी वाटायचं. पण ते का योग्य आहे, हे आम्हाला जे प्रशिक्षण दिलं त्यातून मला समजलं. गर्भधारणा कशी होते यापासून ते गर्भपात का करावा लागतो आणि तो गर्भपात कोणत्या पद्धतीने केला जातो याचे सखोल ज्ञान या आठ दिवसात मला मिळाले आहे. या विषयाची माहिती घेतली त्या दिवसापासून मला स्वतःच्या आयुष्याला एक नवी दिशा मिळत आहे असं वाटतं.

गर्भपात या विषयाबद्दल स्वतःची समज काय आहे, हे मांडायला आम्हाला प्रशिक्षणाच्या दुसऱ्या दिवशी सांगितलं होतं. त्या दिवशी खूप जणींचे वेगवेगळे मुद्दे आले होते त्यात एक मुद्दा म्हणजे मला न पटणारा होता. तो म्हणजे, गर्भपात करणे म्हणजे एक जीवाची हत्या करणे, असं मांडण्यात आलं होतं. परंतु गर्भपात होतो म्हणजे ज्यावेळी एखाद्या स्त्रीचा घरी गर्भपात झाला, गर्भ पडला तर तो गर्भ जिंवत राहू शकत नाही. जे स्वतंत्र जगू शकत नाही त्याला जीव म्हणायचं कशाला? गर्भपात हा स्त्रीचा हक्क आहे आणि तो मिळविण्यासाठी तिने सतत प्रयत्न करावे असं मला वाटतं.

आता प्रशिक्षण घेतलं. बऱ्याच गावातून माहिती गोळा केली. कोडींग पूर्ण झाले. यानंतर स्त्रीला गर्भपात करण्याचा अधिकार असावा. आणि कोणतंही कारण असेल तरी त्या कारणास्तव तिला जर गर्भपात करून हवा असेल तर करून द्यावा असं वाटतं. गर्भपात करायचा म्हटलं तर दवाखान्यात डॉक्टर सगळ्या कारणास्तव गर्भपात करून देत नाहीत. मग स्त्रीला त्यासाठी ज्या कारणास्तव गर्भपात करून देतात, ते कारण शोधावे लागते. मग त्याचे पुरावे, संमती हे सर्व करावे लागते. तर तशी करण्याची गरज पडू नये असं मला वाटतं. जर त्या स्त्रीला हवं त्याप्रमाणे म्हणजे तिच्या वैयक्तिक मताप्रमाणे गर्भपात करून हवा असेल तर इतरांची संमती वगैरे मागू नये. गर्भपातापूर्वी व गर्भपातानंतर स्त्रिला सर्व सुरक्षितता व सुविधा डॉक्टर व कुटुंबियाकडून मिळावी असं मला वाटतं.

.....सुनिता

# स्त्रीची व्यथा, गर्भपाताची कथा.....

पहिल्यांदा गर्भपाताबददूल मला खूप काही माहिती नव्हतं. गर्भपात झाला, गर्भपात करायचाय एवढं मात्र मी ऐकून होते. पण म्हणजे नक्की काय असतं हा मला प्रश्न असायचा. विचारायचं म्हटल तरी कोणाला विचारणार? जाऊ दे पुढे कळेलच, म्हणून माझा प्रश्न मनातच राहिला. याचं उत्तर मिळाले आपल्या सेहतमध्ये.

या विषयावर पहिल्यांदा तर मला वाटायचं की स्त्रीने गर्भपात करूच नये. कारण ती एका जीवाची हत्या होणार असते ते तिला समजलं पाहिजे. परंतु इथं एक स्लाईड शो पाहिला. त्यात गर्भपाताचे प्रकार, पद्धती, स्त्रियांचे आरोग्य अशा अनेक गोष्टींचा अभ्यास मांडला होता. गर्भधारणा धोक्याची असेल. त्यावेळी गर्भपात करणंच योग्य ठरेल. कारण ती जर जिवंत राहिली तर अनेक बाळांना जन्म देऊ शकते. पण तीच या जगात नसेल तर काहीच अर्थ राहणार नाही.

१८७१ च्या म्हणजे ब्रिटीश काळातील पीनल कोडप्रमाणे गर्भपातासाठी तर कुठलीच सवलत नव्हती. नैसर्गिक गर्भपात होत असतील तेवढेच. परंतु कृत्रिम गर्भपाताला कोणत्याही प्रकारची सूट नव्हती. किती अवघड परिस्थिती होती. म्हणजे एखाद्या स्त्रीवर बलात्कार झाला तर तिनं काय करायचं? त्यानंतर विधवा स्त्रिया, गर्भनिरोधक घेऊन सुद्धा गर्भधारणा झालेल्या स्त्रिया यांना गर्भपाताच्या संधी किंवा सूट अजिबात नव्हती. या सर्वांवर उपाय म्हणून भारत सरकारने १९७१ मध्ये गर्भपाताचा कायदा केला. स्त्रियांना वाटेल तेव्हा त्या गर्भपात करू शकतात. पण याचा बरेच लोक गैरफायदा घेऊ लागले. विचार केल्यावर वाटतं हा निसर्ग किती सुंदर आणि चमत्कारिक आहे. स्त्री-पुरुषाच्या मिलनातून, प्रेमातून झालेलं अपत्य हे आयुष्यभर जपण्यासारखी एक अमूल्य भेट दोघं एकमेकांना देतात. पण, परंतु, किंतू या शब्दांमुळेच रामायण, महाभारत घडले आणि या शब्दामुळेच एक नवीन 'गर्भपात' नावाचा शब्द जन्माला आला.

थोडंस मनात येत बी.ए. नंतर आपण डॉक्टर तर नाही ना होणार? म्हणणे इतकं सोपं आणि शक्य नाही. पण इतक्या कमी दिवसात स्त्रीची व्यथा आणि गर्भपाताची कथा अभ्यासली आहे. ही समज  प्रोजेक्ट पुरती मर्यादित न राहता माझ्या भविष्यातही मला फायद्याची ठरणार.

गर्भपात हा प्रत्येक स्त्रीचा हक्क आहे आणि तो तिला मिळालाच पाहिजे प्रत्यक्षात बायकांबरोबर बोलत असताना कळलं की  अनेक कारणं असतात की ज्यामुळे गर्भपात करावा लागतो.कधी घरची आर्थिक परिस्थिती हलाखीची  असते.  नवरा त्या बायकोला नसबंदी करू देत नाही.  गर्भनिरोधक वापरू  देत नाही. स्वतःही वापरत नाही. ह्या परिस्थितीत 'केळीच्या गाभ्या' प्रमाणे मुलं जन्माला घालण्यापेक्षा ती गर्भपात करण्यास तयार होते.

परंतु खेडोपाडी स्त्रिया दवाखान्यात न जाता अंगारे-धुपारे, झाडपाला, गंडे-दोरे यांच्यामार्फत गर्भपात करून घेतात.  खूप कठीण मार्ग त्या अवलंबतात.  आणि याचे परिणाम स्त्रियांना उर्वरित आयुष्यात भोगावे लागतात. एका गावात एका मावशींनी भगताकडून अनेकदा गर्भपात करून घेतल्यामुळे त्यांना आता कंबरेखालील भागात जीवच उरला नाही असं कळलं.  त्या आता चालूही शकत नाही. इतके वाईट परिणाम होतात. परंतु सध्याच्या डॉक्टरांचा गर्भपात करणे एक व्यवसायच होऊन बसलाय. अनेक सरकारी दवाखान्यात नीट लक्ष दिलं जात नाही. म्हणून बायका खाजगी दवाखान्याकडे वळतात. तिथं  तर पैसे देऊनही वाईट परिस्थिती. बऱ्याचदा स्त्रियांना आपण केलेला गर्भपात उघडकीस आणायचा नसतो.  याचा  डॉक्टर आणि तेथील नोकर फायदा घेतात.  या दबावाखाली मिळेल ती सेवा घेऊन एक अक्षरही न बोलता बायका तिथून जातात. एक मावशी म्हणाल्या, 'गर्भपात केला, पैसे मिळाले म्हणजे बास. मग ती बाई जगू की मरू याचं डॉक्टरांना काय देणघेणं!'  डॉक्टर खूप वाईट प्रकारे ट्रीट करत असतात. गर्भपातानंतरच्या समस्याकडे ते बिनधास्त दुर्लक्ष करतात. मग बाईने एखादी कसली तरी गोळी घ्यायची आणि तात्पुरता आजार थांबावायचा. सततच्या करून घेतलेल्या आणि नैसर्गिकरित्या झालेल्या गर्भपातामुळे,  डॉक्टरी सेवा नीट न मिळाल्यामुळे, कुटुंबियांकडून दुर्लक्ष झाल्यामुळे बायकांना कायमचे आजार होतात.

**.....शकुंतला**

# ‘पाडलं’ किंवा ‘पडलं’.....

गर्भपात हा शब्दच आपल्याकडे निषिद्ध मानला जातो. त्यामुळे गर्भपात जर केला तर त्याचा स्पष्ट उल्लेख न करता, ‘पाडलं’ किंवा ‘पडलं’ अशाप्रकारे बोललं जातं. माझी स्वतःची कल्पना अशी होती की जेव्हा कृत्रिमरित्या गर्भपात केला जातो तेव्हा तो ऑपरेशन प्रमाणे पोटाचा भाग कट करून वगैरे केला जात असेल. आणि मग त्या बाईला खूप त्रास होत असेल. पण तिनं गर्भपात केला म्हणजे  हत्या केली किंवा पाप केलं आहे, अशा दृष्टिने तिच्याकडं पाहिलं जातं. तिला होणारा त्रास कोणीच विचारात घेत नाही.

इथं  अभ्यासाला सुरुवात झाली तेव्हा त्या संदर्भात समाजात असणारे प्रश्न आणि स्त्रियांच्या अडीअडचणीची जाणीव झाली. इथं होणाऱ्या अनेक सत्रांमधून गर्भपाताच्या गैरसमजुती दूर झाल्या आणि स्लाईड शो मुळे खूप सखोल माहिती मिळाली. शिवाय एम.टी.पी. कायदा कसा आहे, त्यातील अटी काय आहेत, त्यांचे किती प्रमाणात काटेकोरपणे पालन होते आणि जे जे होत नाही त्यामागील कायद्याच्या त्रुटी कोणत्या, हेसुद्धा समजू शकलं.

**.....तृप्ती**

# निर्णयाचं स्वातंत्र्य स्त्रियांना नाही.....

'गर्भपात' या विषयी या प्रकल्पात काम करण्याअगोदरची पार्श्वभूमी देऊ इच्छिते. कॉलेजमध्ये असताना आमच्याच वर्गातली एक मुलगी एकाएकी येईनाशी झाली. तेव्हा कोणी म्हणत होते की ती आजारी आहे, कोणी म्हणाले घरी काही तरी त्रास आहे. अशी काही काही कारणे ऐकू आली. खरे तर हॉस्टेलमध्येच राहणारी मुलगी, पण कोणी नीट सांगत नव्हते. काही दिवसांनी कळलं की तिला दिवस गेले होते व त्यामुळे तिला येता येत नव्हते. मग कळले की तिने गर्भपात करून घेतला. मात्र तिचं एक वर्ष यामध्ये गमावले गेलं. हे मात्र चांगले झालं की तिला पुन्हा शिक्षण घेण्यात काही अडथळा आला नाही. ती तिचं शिक्षण पूर्ण करू शकली. अर्थात ज्या विद्यापीठात आम्ही शिकत होतो. तिथं जर काही अडवणूक झाली असती तर ते त्या विद्यापीठाच्या परंपरेविरूध्दचे पाऊल असतं. असं म्हणण्याचं कारण म्हणजे आम्ही श्रीमती नाथीबाई ठाकरसी विद्यापीठात शिकत होतो. ज्याचा पाया स्त्री सुधारक मंडळींनी घातला होता. तिथून खरं तर हेच वागणं अपेक्षितही होतं.

'गर्भपात' विषयी वैद्यकीय बाजू समजली, ती परिचारिकेच शिक्षण घेतलं तेव्हा. त्याच्या ज्या सामाजिक बाजू आहेत, ज्या स्त्रियांच्या वाटेला अवहेलनेशिवाय काही आणून देत नाहीत, या बाजू स्पष्ट झाल्या नव्हत्या. प्रोजेक्टमध्ये काम केल्यामुळं गर्भपाताबद्दल विविध अंगाची ओळख जास्त जवळून झाली. शिक्षणाने देखील म्हणावे तसे सुधारणा झाल्या नाहीत. अशी उदाहरणे सर्रास पहायला मिळतात. एका शिक्षिकेने मुलगा होण्याच्या आग्रहाखातर, घरच्यांच्या दबावामुळे सलग दोन गर्भपात करून घेतले. निर्णय घेण्याची क्षमता असूनही निर्णय घेण्याचे स्वातंत्र्य नसल्यामुळे हे घडत आहे. अर्थात ज्या समाजात आपण राहतो त्यामध्ये आमूलाग्र बदल लगोलग अपेक्षित नाही कारण सर्वश्रुत व सिद्ध आहे की, परंपरा ह्या जरी बाह्यता बदलू पाहिल्या तरी त्याचा गाभा अबाधित राहतो. परंतु हे बदल कालांतराने होतील असा आशावादी दृष्टिकोन ठेवणे अगदी गैर देखील नाही.

.....**गार्गी**

# गर्भपातासाठी दबाव नको.....

गर्भपात, ग ात असं मी बऱ्याच जणांकडून ऐकून होते. पण मला या विषयाबद्दल खूप काही माहिती नव्हती. सेहत संस्थेत आल्यापासून या विषयाबद्दल कळू लागले. गर्भपात करणे हा स चा स्वतःचा निर्णय हवा. त्यासाठी तिच्यावर कुठल्याही प्रकारचा दबाव असता कामा नये. तिच्या शरीरावर तिचा स्वतःचा हक्क असावा. गर्भपात हा तिच्या त्यावेळच्या रिस्थितीवर अवलंबून असावा. जर जन्माला येणाऱ्या मुलामध्ये शारीरिक अथवा मानसिक अपंगत्व असेल तर गर्भपात करणे योग्य आहे. लिंगचिकित्सेवरून केलेला गर्भ त अयोग्य ठरेल. मुलगा हवा, वंशाचा दिवा हवा हा अट्टाहास नको. मुलापेक्षा मुलीला कमी लेखू नये. मुलगी ही परक्याचे धन ही समजूत वा हुंड्यासारख्या प्रथा जर मो ल्या तरच मुलीला समाजात स्थान प्राप्त होईल आणि मग मुलगा आणि मुलगी यात फरक राहणार नाही. गर्भवतीच्या जीवास जर धोका असेल किंवा तिला जर काही आजा असेल तर त्यावेळेस गर्भपाताशिवाय काही पर्याय शिल्लक नसेल तरच गर्भपात करावा.

विधवा, कु रेका अशा स्त्रियांना गर्भधारणा झाली व त्यांच्यात मुलाची जबाबदारी सांभाळण्याची हिंमत असेल तर त्यांनी गर्भपात करू नये. तसेच यावेळी त्यांनी स्वतःचा व आपल्या णाऱ्या बाळाचा विचार करावा. समाज काय म्हणेल? लोक काय म्हणतील? याचा विचार करू नये. मूल लवकर नको असेल तर पुढाकार घेऊन स्त्रीने जर आपल्या प शी या विषयावर संवाद साधला तर होणारा गर्भपात टळू शकेल. योग्य डॉक्टरांचा सल्ला घेऊन गर्भनिरोधके वापरावीत. जर असं न करता गर्भधारणा झालीच तर त्या नि पराध बालकाची हत्या करण्याचा अधिकार आपल्याला कुणीही दिलेला नाही.

**.....प्रमिला**

# कायद्याची माहिती सर्वांना हवी.....

'गर्भपात' या विषयांचे माझे ज्ञान अगदी जुजबी स्वरूपाचं होते. गर्भपात म्हटले की, असं वाटायचे 'एका जीवाची हत्या' किंवा जड वस्तू उचलल्यामुळे 'गर्भपात' होतो. प्रशिक्षणामध्ये माझे अनेक गैरसमज दूर होऊन 'गर्भपाताविषयी' मला शास्त्रीय माहिती मिळाली. ही माहिती मला ज्या प्रमाणे मिळाली तसेच समाजातील सर्व स्त्रियांनाही मिळायला हवी. कारण समाजात अशा किती तरी स्त्रिया आहेत की, त्यांना हे ही माहिती नाही की, 'गर्भपाताचा कायदा' असतो आणि तो त्यांचा हक्क आहे. अशा कितीतरी गोष्टींचे अपुरे ज्ञान असल्यामुळे येणाऱ्या जीवाची आणि स्वतःची हत्या करणे हाच मार्ग स्त्रिया पत्करताना दिसतात.

माझं स्वतःचे मत गर्भपाताविषयी परिस्थितीनुसार आहे. गर्भपात हा स्त्रीचा कायद्यानुसार हक्क आहे. पण स्त्रियांनीही त्याचा योग्य वापर केला पाहिजे. मुलगा पाहिजे म्हणून मुलीची हत्या करू नये. मुलगा मुलगी भेद करू नये असं ठाम मत आहे.

प्रशिक्षणाच्या वेळी आम्हाला जो स्लाईड शो दाखवला त्यावेळी मी मनातून खूपच घाबरले होते कारण गर्भपात व्हावा म्हणून अनेकजण उंचावरून उडी टाकणे, पोटावर लाथ मारणे, हे अघोरी मार्ग अवलंबतात. हे पाहताना मला जरा भयानकच वाटत होते. पण जे हे करतात त्या स्त्रियांना कशाचीही माहिती नसल्यामुळे होते. अशा गोष्टींची उघड चर्चा होणं खूप गरजेचं आहे. गर्भपात, त्यांचे चांगले वाईट परिणाम याची सर्वांना माहिती मिळणे आता गरजेचं आणि महत्त्वाचं आहे. चंद्राताईनी उत्तम प्रकारे 'स्त्री आरोग्या' विषयी माहिती दिली आहे. घरात गेल्यानंतर आत्या, वहिनी माझ्याकडे 'आज काय शिकवले?' म्हणून चौकशी करतात. माझे बोलून झाले की, त्याच म्हणतात, "आत्ताची राणी आणि आधीची राणी यामध्ये खूप फरक आहे."

**.....वैशाली सा.**

# आधी वाटायचं, ही तर जीवाची हत्या!.....

पहिल्यांदा गर्भपात हाच एक गुन्हा वाटायचा. कारण ती एका जीवाची हत्या. गुन्हा तर आहे तरी सुद्धा फायदेशीर आहे. पण आता वाटतं गर्भपात गुन्हा नाही तर स्त्रीचा हक्क आहे. कारण तिच्या शरीरावर तिचा हक्क आहे. मूल हवं की नाही? मूल कधी हवं? गर्भपात करायचा की नाही? हा तिचा व्यक्तिगत प्रश्न राहिला पाहिजे पण तसं होत नाही. स्वतःचा निर्णय स्वतः घेणे हे सुद्धा तिच्या नवऱ्याला मान्य नसतं. गर्भपात करण्यासाठी बायका डॉक्टरांकडे गेल्या की डॉक्टर त्यांना त्यांच्या नवऱ्याची सही मागतात. तिथे त्याची गरज नसते, असं आपल्याला एम.टी.पी. कायदा सांगतो. आपल्या देशात मुलगा आहे की मुलगी अशी लिंगाची तपासणी करुन गर्भपात करतात, हा कायद्याने गुन्हा आहे. कारण हा तर भेदभाव आहे. मुलगी असेल तर गर्भपात केला जातो. हा गर्भपात करताना स्त्रीचा जीवसुद्धा धोक्यात येतो. गर्भलिंग तपासणी २० आठवड्यानंतर केली जाते. कारण तेव्हा तो अवयव तयार झालेला असतो. खरंतर मुलगा किंवा मुलगी होणे हे पुरुषावर अवलंबून असतं म्हणून तो स्त्रियांचा दोष नाही. तरीही स्त्रियांनाच का दोषी ठरवितात?

**....सारिका**

# गर्भपात करण्यासाठी परिस्थितीही जबाबदार.....

पोटात असलेल्या मुलाला जन्माच्या आधीच पाडून टाकणे. बंधनातून मुक्त होणे. असाच विचार गर्भपात या शब्दाने मनात यायचा. मला नेहमी असंच वाटायचं की लग्न न झालेल्या मुली जेव्हा प्रेम प्रकरणातून फसवल्या जातात किंवा बलात्कारातून गरोदर होतात, तेव्हा त्याच गर्भपात करून घेतात व मोकळ्या होतात. प्रीति ताईनं सांगितलं की आपण फक्त विवाहित स्त्रियांची माहिती या प्रकल्पासाठी घेणार आहोत. अविवाहित मुली धरणार नाही. तेव्हा पहिल्यांदा मला विवाहित स्त्रियांदेखील गर्भपात कृत्रिम पद्धतीने करून घेतात असं कळलं.

विवाहित स्त्रिया कृत्रिम गर्भपात करतात, हे मला अयोग्य वाटत होतं. परंतु सेहतचे प्रशिक्षण घेताना समजलं की गर्भपात करण्यासाठी त्या स्त्रीच्या आजूबाजूची परिस्थिती जबाबदार ठरते. हे सर्व जेव्हा समजलं तेव्हा गर्भपात हा योग्य आहे, असं वाटू लागलं.

पहिल्यादा जी गोष्ट लाजिरवाणी वाटत होती. तीच आता समजल्यामुळे त्याबद्दल भीती किंवा राग द्वेष या भावना बदलल्या गेल्या. गर्भपात करणाऱ्या व्यक्तीची त्या काळची परिस्थिती, इतर कारणे आणि त्याचे विचार हे सर्व जाणून घेणं गरजेचं असतं. मला याबाबतीत पुरेसं ज्ञान मिळाल्यामुळे माझं मत बदलू शकले.

**.....जागृती**

# स्वतःच्या शरीराची ओळख झाली.....

मला एवढंच माहीत होतं की गर्भपात हा दोन प्रकारचा असतो. नैसर्गिक व कृत्रिम. गर्भपात या विषयाबद्दल मनमोकळेपणाने कोठेही चर्चा केली जात नाही. त्यामुळे गर्भपात म्हणजे काय? ह्या विषयाबद्दल आवश्यक असणारी पुरेशी माहिती मला यापूर्वी कधीही मिळाली नव्हती. एम.टी.पी. ॲक्टची माहिती केवळ प्रशिक्षणामुळेच मिळाली. ह्या प्रशिक्षणामध्ये स्त्रियांच्या कोणत्या समस्या असतील, गर्भपात करण्यामागे कोण-कोण जबाबदार आहे, ह्या गोष्टींचा तर्क आम्ही वेगवेगळ्या प्रकारे विचार करून घेत होतो. आणि प्रत्यक्ष परिस्थितीचा अंदाज कार्यक्षेत्रातील काम करत असताना येत होता.

गर्भपात करावा किंवा नाही हा निर्णय स्त्रीने स्वतः घ्यायला हवा. त्यासाठी तिच्यावर कुठल्याही प्रकारचा तणाव असता कामा नये, तिच्या शरीरावर तिचा स्वतःचा हक्क असावा. मग तिच्यावर सामाजिक, कायदेशीर, राजकीय आणि वैद्यकीय जबाबदारी असू नये. गर्भपात करणे न करणे हे तिच्या त्यावेळच्या परिस्थितीवर अवलंबून असते. जर जन्माला येणाऱ्या मुलामध्ये अपंगत्व असेल तर गर्भपात करणे हे योग्य आहे. पण लिंगचिकित्सेवरून केलेला गर्भपात अयोग्य ठरेल. विधवा व कुमारिका मातांना जर गर्भपात करायचा नसेल तर त्यांच्यात मुलाला सांभाळण्याची हिंमत असावी लागते. कारण त्या मुलाची जबाबदारी त्यांच्यावर असते. त्यावेळी त्यांनी स्वतःचा व आपल्या बाळाचा विचार करायला हवा. गर्भपात करणे किंवा न करणे हे त्यावेळच्या परिस्थितीवर अवलंबून असते.

गर्भपात या विषयाबरोबरच आम्हाला आमच्या शरीराबद्दल आवश्यक असणारी माहिती मिळाली. जी आम्हाला कोणत्याही शाळेतून/कॉलेज मधून/ आईकडून मिळाली नव्हती. अशी माहिती या प्रशिक्षणात चंद्राताई यांच्याकडून खूप सोप्या भाषेत मिळाली आहे. या प्रशिक्षणात मैत्रिणींमध्ये वाढ झालीच त्याचबरोबर माझ्या ज्ञानात सुध्दा बरीच भर पडली आहे.

**.....लक्ष्मी**

# गर्भपाताचा वास्तव अर्थ समजला.....

गर्भपात हा शब्द सुध्दा कॉलेजमध्ये जेव्हा एक व्याख्यान झाले त्यावेळेसच समजला. तरी देखील त्याचे पूर्णतः ज्ञान मात्र मिळाले नाही. नुसतं जेव्हा "स्त्रियांना मूल नको असतं" तेव्हा त्या गर्भपात (बाळाला मारतात) एवढाच या शब्दाचा अर्थ अभिप्रेत होता. पण ज्यावेळेस सेहत या संस्थेमध्ये गर्भपात या विषयावर काम करायचं आहे असं मला समजलं, त्यावेळेस मुलाखतीमध्ये सुध्दा मला गर्भपाताविषयी प्रश्न विचारला. तेव्हा सुध्दा मी उत्तर दिलं की, स्त्रियांवर जेव्हा बलात्कार होतो तेव्हाच तिने गर्भपात करावा. असं वाटायचे कारण मला त्याची एकच बाजू माहीत होती. त्याला जबाबदार असलेल्या इतर गोष्टींची माहिती मात्र अजिबात नव्हती.

टि.व्ही. वर मंजिले नावाची एक सिरीयल लागते त्यामध्ये एक मुलगी कुमारी माता असते. तिचे एका मुलावर प्रेम असते व त्या प्रेमातून ती अविवाहित असताना गरोदर राहते. तिचा प्रेमी तिला सोडून बाहेरगावी जातो. त्यावेळेस तिच्यावर त्या बाळाची एक प्रकारे जबाबदारी येते. पण त्याचवेळेस तिच्या घरची मंडळी तिला गर्भपात करण्याचा सल्ला देतात व खूप आग्रह करतात. कारण त्यांची सामाजिक प्रतिष्ठा आडवी येते. अशा परिस्थितही ती बाळाला जन्म देण्याचा निर्धार करते. कारण ते त्यांच्या प्रेमाचं प्रतीक असतं. हे पाहिल्यावरच मला असं वाटायचं की केवळ बाळाची हत्या म्हणजेच गर्भपात! पण ज्यावेळेस 'सेहत' मध्ये गर्भपात या विषयाचा अभ्यास करायला सुरुवात केली त्यावेळेस गर्भपात या विषयाबद्दलची माझी समजूत थोड्या फार प्रमाणात विस्तारली. कळलं की स्त्री जेव्हा गर्भपात करते, त्यावेळेस त्याची कारणे वेगवेगळी असतात व परिस्थितीही वेगळी असते.

सेहतमध्ये गर्भपाताविषयी खूप सविस्तर माहिती दिली. त्यावेळेस गर्भपाताविषयीची माझी जी जुनी समज होती त्यामध्ये थोड्याफार प्रमाणात नाहीतर खूपच बदल झाला.

गर्भपाताविषयी झालेल्या माहितीमुळे माझ्या विचारांमध्ये, कल्पनांमध्ये एवढंच नव्हे तर भावी काळात जर माझ्यावर असा प्रसंग आला तर कृतीमध्ये नक्कीच बदल होईल. या प्रशिक्षणामध्ये मला स्त्रियांच्या शरीराविषयी, तिच्या पाळीविषयी, बाळंतपणाविषयी तसंच स्त्रियांच्याच नव्हे तर पुरुषाच्या शरीराविषयी देखील खूपच सविस्तर माहिती मिळाली. त्यामुळे माझ्या समजेला थोडासा दुजोरा मिळाला. जी समज होती त्यामध्ये खूपच बदल झाला, नवीन विचारांची भर पडली.

.....**अश्विनी**

# वैद्यकीय सुविधांमध्ये सुधारणा हवी.....

सुरुवातीला गर्भपात कायदा आहे, याविषयी माहिती होती. परंतु सखोल माहिती नव्हती. इथे आल्यानंतर गर्भपात असावा की नसावा याविषयी विचार करण्यास चालना मिळाली.

जरी गर्भपात हा कायदा १९७२ मध्ये अस्तित्वात आला असला तरी गर्भपात हे फार पूर्वीपासून होत आले आहेत व ते वेगवेगळ्या पद्धतीने होत असत. धार्मिकदृष्ट्या गर्भपात हा गुन्हा मानला जातो. मनुस्मृतीमध्ये ही गर्भपातास विरोध करण्यात आला आहे. आजही ख्रिश्चन धर्मामध्ये गर्भपात व गर्भनिरोधक साधने वापरणे याबाबत विरोध दर्शविला जातो. गर्भपाताचे प्रकार दोन आहेत. एक कृत्रिम व दुसरा नैसर्गिक. गर्भपात हा स्त्री कुठल्या परिस्थितीमध्ये करु इच्छिते यावर अवलंबून असते. कुठल्याही परिस्थितीमध्ये गर्भपात करण्यास तिची मनापासून इच्छा नसते, परंतु काही वेळा तिला सामाजिक बंधनांचे पालन करावे लागते. तसेच कौटुंबिक, आर्थिक परिस्थितीही तेवढीच कारणीभूत असते. होणारे मूल हे दोघांचे (नवरा-बायकोचे) असते. परंतु सर्व त्रास स्त्रीला सहन करावा लागतो, मात्र त्याबाबतच्या निर्णयप्रक्रियेमधील तिचा सहभाग महत्त्वाचा मानला जात नाही.

गर्भपातामुळे स्त्रीच्या आरोग्यावर परिणाम होतो. स्त्री ही शारिरीक व मानसिक दृष्ट्या खचून जाते. तिच्या मनामध्ये न्यूनगंड निर्माण झालेला असतो. अपराधीपणाची भावना तिच्या मनामध्ये असते. गर्भपात करतेवेळी तिला अनेक गोष्टींना सामोरे जावे लागते. यामधील एक महत्त्वाचे म्हणजे वैद्यकीय तपासण्या. सरकारी किंवा खाजगी दवाखान्यातून इलाज घेत असताना तिच्यावर अनेक दडपणे येत असतात. उदा. - नवऱ्याची संमती. कायद्याने गर्भपात करतेवेळी स्त्रीस नवऱ्याची संमती असणे आवश्यक नाही परंतु अशी तोंडी संमती मिळणे सुरक्षित वाटते. नाबालिक मुलीच्या बाबतीत पालकांची संमती असणे आवश्यकता डॉक्टरांना असते याबाबत गैर वाटत नाही. गर्भपात कायद्यामुळे स्त्रीला बऱ्याच प्रमाणामध्ये संरक्षण मिळाले आहे. तरीही गर्भपातासंदर्भात दिल्या जाणाऱ्या वैद्यकीय सुविधांमध्ये सुधारणा होणे आवश्यक वाटते.

**.....अचला**

# विषयाबद्दल जिव्हाळा निर्माण झाला.....

मला प्रशिक्षणामध्ये जाणीव झाली. की गर्भपात हा स्त्रीचा खाजगी प्रश्न नसून तो आता एक सामाजिक प्रश्न आहे. याची पुसटशी कल्पनाही मला कधी झाली नाही. प्रशिक्षणाच्या पहिल्या दिवशी जेव्हा हे प्रशिक्षण २१ तारखेपर्यंत आहे हे समजले तेंव्हा सतत मनात असा प्रश्न यायचा की फक्त गर्भपाताच्या संदर्भात सर्व्हे करायचा आणि एखाद्या क्षुल्लकशा विषयासाठी २१ दिवस कशासाठी?

पण प्रत्येक विषय अगदी खोलवर जाऊन आमच्या मनात ते रुजविण्यासाठी सेहत ग्रुपने मनापासून केलेले प्रयत्न अनुभवले. तेव्हा प्रकर्षाने जाणीव झाली ती मला किती अर्धवट माहिती आहे याची. आणि मला तर वाटायचं की स्त्री म्हणून मला माझ्या शरीराची माहिती आहे. पण खरंतर मासीक पाळी कशी येते व प्रत्यक्ष गर्भधारणा कशी होते ही माहिती तर चंद्राच्या प्रभावी पाठामुळंच समजली.

पूर्वी गर्भपात या शब्दावर कधी विचारच केला नव्हता. गर्भपात शब्द उच्चारतानाही एक कोरडेपणा होता. ज्यांना गर्भपात करायचा आहे त्यांनी करुन घ्यावा. योग्य का अयोग्य या गोष्टी कधी डोळ्यासमोर आल्याच नाहीत. आज गर्भपात हा शब्द मनाला खूप स्पर्शून जातो. तो शब्द डोळ्यासमोर आला की सेहत ग्रुप प्रथम दिसतो. गर्भपाताच्या विषयामध्ये इतका जिव्हाळा निर्माण झाला आहे की पेपरमध्ये किंवा मासिक अन्य वाचनांमध्ये या संदर्भात काही नोट असली की सर्व सोडून पहिल्यांदा ती चौकट आज वाचली जाते. १५ मिनिटांच्या छोट्याशा शस्त्रक्रियेशी निगडीत स्त्री आरोग्य किती धोकादायक बनत चाललंय याची वास्तवता प्रकट होते. गर्भपात करुन घेणं हे किती धोकादायक आहे हे आजच समजलं. आणि त्यातून निर्माण होणारे संभाव्य धोके, आजार याचा विचारही अस्वस्थ करतो.

स्त्रीला नवऱ्याच्या सही शिवाय गर्भपाताचा अधिकार आहे हे सुध्दा सेहत मध्येच आणि पहिल्यांदाच समजले. आज मलाच नव्हे तर ग्रुपमध्ये कोणत्याही मुलीला गर्भपाताच्या संदर्भात दहा मिनिटं बोलायला सांगितलं, तर मला खात्री आहे ती दहा तास त्यावर डिटेल बोलेल. आणि आम्हा सर्वांच्या भावी आयुष्यात याचे पडसाद नक्कीच उमटतील. आमच्या डोळ्यासमोर कधी असे प्रसंग आले तर "ज्या स्त्रीला गर्भपात न करता तिचं बाळ तिला हवं असेल" अशा ठिकाणी नक्कीच आम्ही तिला व तिच्या कुटुंबाला समजाऊन सांगून त्या स्त्रीला मदत करु.

**....अनघा**

# संवेदनशील विषय.....

गर्भपात हा विषय फक्त मोठ्या व्यक्तिंनी बोलण्याचा विषय. लहानांनी हा शब्दही उच्चारू नये, अशा पारंपरिक चौकटीतील मी. घरी ज्यावेळी सेहत मध्ये काम करणार असं सांगितलं त्यावेळेस घरातील सर्वाना चांगल्या पगाराची नोकरी व ते ही पुण्यात हे ऐकून आनंद झाला. संस्था कशावर काम करते अशी विचारणा झाली. आरोग्यावर काम करते म्हटल्यावर सगळेजण 'आत्ता काय डॉक्टर होणार!' असं म्हणायला लागले. गंमतीचा भाग सोडला तर सर्वाना फक्त मी आरोग्याच्या प्रश्नावर काम करणार असंच सांगितल होतं. अजून मलाही कामाबद्दल फारशी माहिती नव्हती. मुलाखती नंतर एक दिवसाची मिंटीग घेण्यात आली. व त्यात एक महिन्याचे प्रशिक्षण दिलं जाणार आहे व हे प्रशिक्षण गर्भपात दर व काळजी या विषयावर असणार आहे हे सांगण्यात आले. एम.एस.डब्ल्यू. नंतर प्रशिक्षणाचं महत्त्व पटलं होतं. परंतु या एवढ्याशा विषयाला तीन दिवसाचे प्रशिक्षण पुरे. एक महिना काय करायचं ? असाच विचार मनात घोळत होता. एक महिन्यानंतर मात्र आपला हा विचार किती निरर्थक होता हे मनापासून पटलं.

गर्भपात ह्या विषयाबद्दल संकोच, भीती, अपुरी माहिती, आपल्याला काय करायचं, आपलं थोडंच वय आहे? अशी विचारसरणी असलेल्या आम्हा मुलींना गर्भपातासंदर्भात सोप्या भाषेत शास्त्रीय माहिती देऊन, या संवेदनशील विषयाचे गांभीर्य राखून माहिती देण्याचे, फारच कठीण काम सेहतने सहजरित्या करून दिले.

**.....राखी**

# गर्भपातानंतर आराम मिळायला हवा.....

सेहतमध्ये आल्यानंतरच गर्भपात या विषयावर मी विचार केला असेल त्या अगोदर गर्भपात याविषयी कोणाशी बोलले नव्हते. कधी वाचलेही नव्हते. त्याबद्दलचे कायदेही माहीत नव्हते. कोणत्याही व्यक्तीवर जबरदस्ती करणे वाईटच त्यामुळे एखाद्या स्त्रीला स्वतःला वाटत असेल की गर्भपात करावा तर तो अधिकार तिला असावा. त्याबाबत कोणतीही बंधने अटी तिला असू नये. तसेच गर्भपात करण्यासाठी तिच्यावर कोणीही जबरदस्ती करू नये.

सध्याच्या परिस्थितीत कायद्यानुसार स्त्रीला गर्भपाताचा अधिकार देण्यात आला आहे. असं उघड उघड म्हटले जाते. परंतु किती स्त्रिया स्वतःच्या मनाने हा निर्णय घेतात? घरचं किंवा समाजाचं दडपण तिच्यावर असतंच. किती डॉक्टर जेव्हा फक्त एकटीच बाई गर्भपातासाठी दवाखान्यात जाते तेव्हा नवरा किंवा अन्य व्यक्ती बरोबर आले आहेत का? हे विचारत नाहीत त्यांची संमती मागत नाहीत. नोकरीमुळे, शिक्षणामुळे स्वतःला व होणाऱ्या बाळालाही त्रास होईल म्हणून गर्भपात केला असं सांगणाऱ्या स्त्रिया कमी आहेत. तर मुलगा हवा म्हणून मीच गर्भपात करण्याचा निर्णय घेतला असे सांगणाऱ्या स्त्रियाही आहेत. फिल्डमध्ये स्त्रियांच्या मुलाखती घेताना एखादी बाई जेव्हा स्वतःच्या गर्भपाताविषयी माहिती द्यायची तेव्हा काही वेळेस ऐकताना सुद्धा त्रास व्हायचा. गर्भपाताच्या वेळेस, त्यांनतर स्त्रीला योग्य औषध उपचाराची, आरामाची, प्रेमाची गरज असते. परंतु बऱ्याच वेळा ह्या गोष्टी तिला मिळत नाहीत. अनेक वेळा डॉक्टर ही व्यवस्थित लक्ष देत नाही. गर्भपाताच्या वेळी व नंतर होणारा त्रास हा फक्त त्या स्त्रीलाच सहन करावा लागतो. त्यामुळे गर्भपात करावा की नाही हा अधिकार फक्त तिलाच असावा. तसंच आपल्या समाजामध्ये बाळाला जन्म दिल्यानंतर बाळाच्या संगोपनाची पूर्णपणे जबाबदारी फक्त आईच घेत असते आणि त्या बरोबर अनेक जबाबदाऱ्याही तिच्यावर येऊन पडतात. त्या स्वीकारण्याची जरी तिची तयारी नसेल तर गर्भपात करण्याचा तिला अधिकार असावाच. गर्भपात हा शब्दच बाईशी जोडलेला आहे. त्यामुळे गर्भपात करायचा की नाही हा निर्णय सर्वस्वी तिनेच घ्यावा.

.....**सविता**

# सर्वांगीण माहिती मिळाली .....

प्रथमतः गर्भपात हा शब्दच उचारणे मला कृतघ्न वाटे. मुलाखतीच्या वेळीही मी गर्भपात करणे किती वाईट असते हे सांगितले होते. जेव्हा सेहतच्या प्रशिक्षणात गर्भपाताबद्दल विविध अंगानी माहिती मिळू लागली. तेव्हा गर्भपात हा स्त्री जीवनातील किती आवश्यक घटक आहे हे समजले.

खरोखर कोणताही सजीव असो तो अनावश्यक गोष्टी वातावरणात टाकत असतो. मग स्त्रीने सुध्दा तीला त्रास होणाऱ्या गोष्टी बाबत जागृत रहायला हवं. तिच्या जीवनात जर काही शरीरातील गर्भपात किंवा अन्य गोष्टींपासून त्रास होत असेल तर तिनेही त्यांना तिलांजली का देऊ नये? वेळीच साऱ्या गोष्टींची दखल घेतली तर भावी आयुष्यात येणाऱ्या समस्यांची सोडवणूक ती बऱ्यापैकी करू शकेल.

ज्यावेळी नैसर्गिक गर्भपात होतात त्यावेळी वाटायंच काही तरी ओझे उचलणे किंवा दुसऱ्या कारणांनी होत असतील असं वाटायचं आणि कधीतरी धार्मिकतेचा अर्थ लोक लावत असत आणि कृत्रिम गर्भपातास तर घरातील व्यक्ती मान्यता देत नाही. त्यावेळी स्त्रिया गुपचूप गर्भपात करुन घेऊन बिचाऱ्या लगेचच कामाला लागतात. त्यावेळी वाटायचं कशाला बायका गर्भपात करत असतील? परंतु आजपर्यंतच्या अभ्यासातून समजले की गर्भपात करणे आवश्यक आहे. तो हक्क तिने घ्यायला हवा.

दुसरे म्हणजे स्वतःच्या शरीराबद्दल मी स्वतः खूप खोल पाण्यात (अज्ञानात) असल्यासारखे वाटले. पुन्हा एकदा वाटलं खरोखर पुस्तकी ज्ञानापेक्षा सर्वांगानी मिळालेले ज्ञान माझ्यासाठीच नव्हे तर माझ्या संबंधातील येणाऱ्या प्रत्येक स्त्रीला मिळालं तर सेहतची उद्दिष्ट्ये गाठायला आधिक वेळ लागणार नाही.

मी इतर स्त्रियांना ह्या अभ्यासाचे महत्त्व पटवून देऊन स्त्रियांची गर्भपाताबाबतची संकल्पना, संकुचित विचारसरणी बदलून त्यांच्या जीवनाला एक वेगळं वळण देऊन त्यांना जागृत करण्याचा प्रयत्न करेन.

खरोखरच बिनभिंतीच्या शाळेमध्ये खूप काही शिकायला मिळतं. तेच जीवनात जगताना उपयोगी पडतं असं मला समजलं. सेहत म्हणजे स्वतःबरोबर इतरांना जागवणारी एक संस्था आहे.

**.....पुष्पा भो**

# मुलीचा गर्भ पाडू नये.....

गर्भपात या विषयाबद्दल आधी फक्त ऐकून माहिती होती. कधी काही कुणाला विचारावं म्हटलं तरी भीती वाटायची, धाडसच व्हायचं नाही. आई नेहमी म्हणायची तुला काय करायचयं नको त्या गोष्टी माहिती करून? परंतु उत्सुकता ही होतीच. लग्न झालेल्या मैत्रिणीही होत्या. पण त्याही याबाबत कधी विषय निघाला तर स्पष्ट बोलल्या नाहीत.

सेहत मध्ये आले तेव्हा फक्त असंच वाटायचं कीं, "वा केवढ्या मोठ्या पगाराची नोकरी लागली!" तेव्हा हा विचारही मनात आला नव्हता की पुढे जाऊन आपल्याला एवढं काही शिकायला मिळणार आहे. पण जेव्हा ट्रेनिंग सुरू झाले तेव्हा एका पाठोपाठ एक धक्के बसत गेले. गर्भपाताविषयीचे सर्व काही गैरसमज दूर झाले. पहिल्या दिवशी ट्रेनिंग मध्ये सुनितातार्इचं लेक्चर झालं. विषय ओळखीला सुरुवात झाली.

चंद्रातार्इच्या लेक्चरमुळे आपल्याच शरीराची आपल्याला नव्याने ओळख झाली. असे वाटायला लागले की आपण इतके दिवस किती अज्ञानी होतो. आपण जर सेहतमध्ये आलोच नसतो. किंवा आपलं सिलेक्शनच झालं नसतं तर? आपण आयुष्यभर एवढ्या अनमोल खजिन्याला मुकलो असतो. एवढी काही माहिती आजपर्यंतच्या ट्रेनिंगमध्ये मिळाली आणि आयुष्याला एक वेगळेच वळण लागल्या सारखे वाटायला लागले. जीवनाकडे बघण्याचा दृष्टीकोनच बदलून गेला.

गर्भपात हा सर्वस्वी त्या स्त्रियांच्याच मनावर असावा. गर्भपात करण्याचा त्या स्त्रीला पूर्णपणे हक्क असावा गर्भपाताबद्दल निर्णय घेताना तिच्यावर कुणाचेही बंधन असू नये. मुलगा किंवा मुलगी हा भेदभाव न करता दोघांनाही जगण्याचा समान हक्क आहे. गर्भपात करणे जर स्त्रीच्या आरोग्याला गरजेचं असेल तर तो तिने करावा.

**स्मिता चो.....**

# नीतीमूल्याधिष्ठित संशोधनाची प्रतिज्ञा !

'स्त्री-आरोग्य आणि गर्भपात' संदर्भात सामाजिक आरोग्याच्या भूमिकेतून हे संशोधन केले जात आहे. ह्या संशोधनात सहभागी होणाऱ्या आम्ही 'अन्वेषी', खालील नीतीतत्वे पाळण्याची प्रतिज्ञा करत आहोत-

- मुलाखत देऊन समाजशास्त्रीय संशोधनात मोलाचे योगदान करणाऱ्या व्यक्तिचा आम्ही आदर करू.
- मुलाखत देणाऱ्या व्यक्तिला संशोधन प्रकल्पासंदर्भातील माहिती जाणून घेण्याचा हक्क आहे, तसेच प्रकल्पासंदर्भातील माहिती त्यांना देणे, ह्या जबाबदारीची आम्हाला जाणीव आहे.
- मुलाखत देणाऱ्या व्यक्तिला संशोधनात सहभागी न होण्याचा किंवा सहभाग अर्ध्यातूनच काढून घेण्याचा हक्क आहे, हे आम्ही जाणतो. या हक्काची पायमल्ली होईल अशी कोणतीही कृती आम्ही करणार नाही.
- मुलाखत देणाऱ्या व्यक्तिच्या आत्मसन्मानाला धक्का पोहचेल, असे कोणतेही वर्तन आम्ही करणार नाही.
- मुलाखत देणाऱ्या व्यक्तिची ओळख आम्ही पूर्णपणे गोपनीय ठेऊ.
- आमच्यापैकी ज्या व्यक्ती विश्लेषणाचे काम करतील, त्या व्यक्ती मुलाखत देणाऱ्या व्यक्तींकडून मिळवलेल्या माहितीचे एकत्रित विश्लेषण, त्यांच्यापर्यंत सारांशरूपाने पोहचविण्याचा प्रामाणिक प्रयत्न करतील.

सही:

नाव:

तारीख:

# अनुभवातून शिक्षण.....

अनुभवासारखा दुसरा शिक्षक नाही, असं समजलं जातं व ते रास्तही आहे. या कामाच्या निमित्ताने अन्वेषींना प्रथमच घराबाहेरच्या जगाची तोंडओळख झाली. स्वतःहून कामाची ओळख देणं, आपलं काम पटवून सांगणं, नवख्या परिसरात जाणं. अनोळखी माणसांशी बोलणं, ओळख वाढवून लोकांना आपलसं करणं, लोकांच्या भल्या-बुऱ्या स्वभावाला तोंड देणं इ. मुळे मुलींना समाजाची आणि स्वतःचीही नवी ओळख व्हायला चांगलीच मदत झाली.............

# मुलाखतीसाठी मनधरणी.....

आम्ही मुलाखती घेण्यासाठी सुरुवात केल्यानंतरचे तिसरे गाव तळा. या ठिकाणी आम्ही लिस्टींग केले नव्हते. दुसऱ्या गटाने केले होते. त्यामुळे ते गाव आम्हाला म्हणजे टीममधील मुलींना नवीन होते. त्या गावातील लोक खूपशी मदत करत नाही असा अनुभव लिस्टींग केलेल्या मुलींकडून ऐकला होता. मुलाखती घ्यायच्या म्हणजे मनात थोडे दडपण होते. त्याचबरोबर मला तर वेळेचेही प्रेशर होते. तरीही मी मनात ठरविले होते की कितीही वेळ गेला तरी चालेल परंतु मुलाखत घ्यायची. शांतपणे सुरुवातीपासून उत्तरं द्यायला सुरुवात झाली होती. या घरात मला मुलाखत घ्यायला तीन तास लागले.

सुरुवातीला दारात गेल्यानंतर कुठून आलो, कोणातर्फे आलो हे सांगितल्यानंतर हेडसाळून लावल्यासारखे केले. तरी मी त्यांना आपल्या मुली येऊन गेल्या, संस्था कुठे आहे, काय प्रकारचे काम करते, कोणकोणते प्रकल्प चालतात याविषयी माहिती दिली. ते ऐकून घेण्याच्या मनस्थितीत नसताना देखील ऐकून घेतील अशा पद्धतीने सांगितले. मग माहिती ऐकून घेतली. त्यानंतर "बसा" म्हणले. बसल्यानंतर त्यांना संमतीपत्रकातील माहिती सांगत असताना त्यांनी अनेक वेगवेगळे प्रश्न, वेगवेगळ्या पद्धतीने विचारले. त्यांची उत्तरे मला जमतील त्याप्रमाणे मी दिली. ते झाल्यानंतर सहीवरून बोलणे झाले होते. तरी त्यांच्या मनात भीती होती. सही घेऊन कुठेतरी अडकवून ठेवतील असे त्यांना वाटत होतं. त्यावरती बोलणं झालं. मग त्यांनी सही दिली.

पुढील घराची प्रश्नावली भरण्यास सुरुवात झाली. प्रत्येक प्रश्न विचारल्यानंतर याची काय आवश्यकता आहे. हे विचारत, त्यावर स्पष्टीकरण द्यावे लागत हाते. ४ ते ५ प्रश्न विचारून भरून झाले असतील तेवढ्यात शेजारचे दोन पुरुष व एक स्त्री आली. मग त्या काकांनी अनेक प्रश्न विचारले. त्याबरोबर ज्या काकांची माहिती घेत होते ते काका पण त्यांच्याबरोबर सामील होऊन तेच तेच प्रश्न विचारत होते. त्यांना पुन्हा एकदा सर्व माहिती सांगितली. त्यानंतर पुन्हा मुलाखत घ्यायला सुरुवात झाली. पुन्हा २ ते ३

प्रश्न भरून झाले तेवढ्यात काकांकडे पाहुणे आले. काका पाहुण्यांबरोबर गप्पा मारू लागले. मग पाहुण्यांनी काकांना हे कोण आहेत हे विचारले. सांगितल्यानंतर लगेच मला प्रश्न विचारण्यास सुरुवात केली. त्यांच्या सर्व प्रश्नांची उत्तरे देऊन झाल्यानंतर ते पाहुणे काकांशी गप्पा मारू लागले. त्या गप्पामध्ये मला देखील सामील व्हावे लागले. त्या गप्पात सामील होऊन मध्येच मी काकांना म्हणाले आता आपण मुलाखत घेऊयात. तेव्हा काका 'हो' बोलले. त्यानंतर काकांनी सर्व माहिती व्यवस्थित दिली. एवढ्यात माझे तीन तास गेले होते.

मग काकांना म्हटलं मावशींची मुलाखत घ्यायची आहे. तेव्हा काका म्हटले, 'त्यांची आतच मुलाखत घ्या'. मग घरात जाऊन तेथील स्त्रियांच्या मुलाखती घेतल्या. त्यानंतर ज्या प्रश्नांबाबत शंका वाटत होती. (घराच्या प्रश्नावलीत) ते प्रश्न काकांना पुन्हा विचारले. त्यांनी त्याची एकदम व्यवस्थित न रागवता, न चिडता उत्तरं दिली. मला छान वाटलं. काकांनी तिन्ही वेळेस खूप प्रश्न वेगवेगळ्या पद्धतीने विचारले होते. नंतर त्यांना मला खूप त्रास दिल्यासारखा वाटत होत असं जाणवलं. घरातुन निघत्यावेळी खूप छान बोलले. पाणी, सरबत घेऊन घराबाहेर पडले.

सेहतमध्ये आल्यानंतर मी पहिल्यांदा कोणाच्या तरी इतक्या प्रश्नांना मला जमतील तशी उत्तरे देऊन पटवून देऊ शकले. दुसरे म्हणजे शांत व सौम्य भाषेत बोलू शकले. ते बोलतील ते ऐकून घेतले. त्यांच्या गप्पात स्वतःहून सामील होऊ शकले. मला जे काम करावयाचे होते ते अर्ध्यात न सोडता पूर्ण करू शकले. तेथील बोललेल्या लोकांच्या मताचा आदराने स्वीकार करून मला जे म्हणायचे होते ते नम्रपणे मांडू शकले. तेथून बाहेर पडताना माझ्यातील या बदलाचे माझे मलाच खूप आश्चर्य वाटत होते.

**.....सुनिता**

# वादळ, वाऱ्यातील अंधाऱ्या रात्री......

ट्रेनिंगनंतर पहिल्यांदा मी, वैशू व मनिषा लिस्टींग साठी गेलो होते. मनिषा मधूनच पुण्याला निघून गेली होती. नंतर पुढे मी व वैशू लिस्टींग करत होतो. पुण्याला काम संपवून जायचे म्हणून उत्सुकता होती. कारण पहिल्यांदाच घरापासून, पुण्यापासून इतके लांब गेलो होतो. आमचे शेवटचे गाव वडगाव ह्या गावाचे लिस्टींग राहिले होते व ते संपल्यानंतर आम्ही पुण्यात येणार होतो.

वडगाव गावच्या तालुक्याच्या एसटी स्टँडवर सामान घेऊन मी व वैशू उतरलो. संध्याकाळच्या पाचच्या सुमारास आम्ही तेथे होतो. एसटी स्टँडवर गावात जाण्यासाठी आम्ही चौकशी करत होतो की गावात जायला येथून बस आहे का तर त्यांना वडगाव नावाच्या गावाबाबत विचारल्यावर चौकशी केंद्रातील माणसे आम्हाला म्हणे हे गाव येथे नाही. आमच्याकडे जो तालुक्याचा नकाशा होता त्यात मात्र हे गाव होते. आम्हाला खात्री होती की गाव तर असणारच. गावाची लोकसंख्या खूपच कमी होती. हे आम्हांला १९९१ च्या माहितीनुसार माहिती होते. मग आम्ही बाहेर दुकानवाल्यांना, जीपवाल्यांना, रिक्षावाल्यांना विचारत होतो की, वडगाव नावाचे गाव येथे जवळपास आहे का तर ते म्हणत होते की त्या नावाची दोन गावे आहेत. एक खूप लांब आहे तेथे जाण्यासाठी गाड्यांची सोय नाही, मग आम्ही आसपासच्या गावाची नावे त्यांना सांगितली तेव्हा एक रिक्षावाला म्हणाला, मला माहिती आहे. पण अर्ध्याच रस्त्यात मी सोडेन, पुढं चिखल आहे.

मग आम्ही ठरविले की गावाचे काही माहित नाही तर आज इथंच रेस्ट हाऊस किंवा लॉज वर राहू व उद्या सकाळी आपण जाऊ. रेस्ट हाऊस तर आम्हाला मिळालं नाही. कारण त्याचे पास जिल्ह्यातून आणावे लागत. मग एका लॉजची चौकशी करत होतो. तेथील लोक आम्ही दोन मुली म्हणून वेगळ्याच नजरेनं पाहात होते व तो लॉज खूपच वाईट अवस्थेत होता. खोलीत जावून पाहिले तर भयानक अस्वच्छता होती. शिवाय इतर सर्व खोल्या कुलूप लावून बंद होत्या. मग आम्ही त्यांना आम्हाला नको म्हणून सांगितलं

व सामान घेऊन पुढच्या लॉजच्या चौकशीसाठी गेलो तर लॉजवाला म्हणे एकही खोली रिकामी नाही व पुढे २ ते ३ लॉजवाल्यांनी ही आम्हाला तेच कारण सांगितलं. यावरून आम्हाला असे वाटत होते की पहिले आम्ही ज्या लॉजची चौकशी करत होतो त्यांनीच सर्व लॉजवाल्यांना सांगितले की दोन मुली येतील त्यांना खोली देऊ नका.

मग आम्ही ठरविलं की काही झाले तरी आता गावातच राहण्यासाठी जाऊयात. पण तोपर्यंत ६ वाजायला आले होते. पुन्हा त्या रिक्षावाल्यांकडे गेलो व त्याला १०० रूपये देऊ असं ठरवलं. रिक्षात बसलो पण भीती होती कारण संध्याकाळची वेळ होती. गाव नक्की माहिती नव्हते. पाऊस पडत होता. आकाश भरून आले होते. वीजाही गरजत होत्या. अशा स्थितीत आम्ही डोलारी येथे येऊन पोचलो व त्याला विचारत होतो की पुढे कसे जायचे तर त्याने आम्हांला सांगितलं की, सरळ हा रोड गावात जातो. रस्त्यात खूप चिखल होता. हातात दोन बॅगा होत्या. पायात चप्पल घालून चालणे शक्यच नव्हते. बिना चप्पलचे चालताना पाय तर चिखलाने भरत होते पण खूप काटे पायात घुसत होते. रस्त्याने एकही घर, माणूस नव्हते. आकाशात वीजा चमकत होत्या तशी जास्त भीती वाटत होती. वैशू न रडता चालली होती. मी मात्र दोन पिशव्या घेवून चिखलातून काटे टोचत असताना रडत चालत होते. वैशू मला समजवण्याचा प्रयत्न करत होती. आपण रात्र कशी घालवणार? गाव पुढे नसेल तर काय काय करायचे? असे असंख्य प्रश्न मनात सतावत होते. भूकही खूप लागली होती व जवळ एकच बिस्किटचा पुडा होता. आम्ही दोघी सतत त्या चिखलातून चालत होतो, की कुठेतरी एखादे घर दिसेल व आपण तेथे राहू.

मागून एक काका पळत येत होते. कुणा तरी एका माणसाला त्या भयाण माळरानात पाहून मला व वैशूला खूप आनंद झाला. मी खूप जोरात रडायला लागले की जसे कोणी ओळखीचे भेटले. मग त्यांनी आमची विचारपूस केली. आम्ही वडगाव गावात जायचे असे सांगितले. ते त्याच गावातले होते असे त्यांनी सांगितल्यावर खूप आनंद झाला. मग काकांनी आमच्या पिशव्या घेतल्या. ते पुढे चालू लागले. काकांना खूप आश्चर्य वाटले की गावाबाबत काहीच माहिती नसताना या दोन पोरी चिखलात गाव शोधत चालल्यात म्हणून. काकांबरोबर एक ते सव्वा तास चालल्यानंतर गावात पोहचलो व काकांच्या घरीच संध्याकाळी राहिलो. काका एका झोपडीत राहत होते. बाहेर पाऊस पडत होता व झोपडी गळकी असल्याने झोपडीत पाणी ही येत होते. त्यांच्या घरातील सर्व जण खूप प्रेमळ होते. त्या रात्री मी व वैशू अर्धी रात्र पायातले काटेच काढत होतो.

उगवणारा दुसरा दिवस त्या गावातला खूप शिकवणारा होता. आयुष्यात आपण कुठल्याही परिस्थितीला सामोरे जाऊ शकतो हा विश्वास आला होता व निसर्गाच्या बरोबर असताना वादळांना, वीजांना, पावसाला, चिखलाला आपण आता घाबरणार नाही असे वाटत होते. एखादे काम दिले तर ते पूर्ण करण्यासाठी कितीही त्रास झाला तरी सहन करू शकतो हा विश्वास निर्माण झाला.

आयुष्यात पहिल्यांदाच मी झोपडीत राहिले होते. पण त्या झोपडीतल्या माणसात किती प्रेम, जिव्हाळा, आपलेपणा असतो हे जवळून अनुभवायला मिळाले.

**.....ज्योती**

# नीतीमूल्यांवरचा भर महत्त्वाचा.....

या आधीपण एका प्रोजेक्टमध्ये काम केलं होतं. त्यामुळे ट्रेनिंग हा एक प्रकल्पाचा अविभाज्य भाग असल्याचं माहीत होतं. अर्थात प्रकल्पाचं काम व्यवस्थित व यशस्वीपणे राबविलं जाणं हे ट्रेनिंग यशस्वीपणे पार पडण्यावर अवलंबून असतं. ह्या प्रकल्पासाठी घेतललं ट्रेनिंगदेखील यशस्वीपणे पार पडलं. ह्यासाठी ज्या वेगळ्या पद्धतींचे वापर झाले ते महत्त्वाचे होते. ज्या शैलीने इथं शिकवलं गेलं त्यामध्ये प्रत्येक व्यक्तीला त्यांच्यामधील गुण, कौशल्य दाखविण्याचा व ओळखण्याचा वाव मिळाला.

'गर्भपात' म्हटला तर एक अवघड विषय. अशा विषयावर अभ्यास करण्यासाठी सर्व प्रकारच्या वयोगटातील, अनुभव असलेल्या/नसलेल्या, वेगवेगळ्या शैक्षणिक पार्श्वभूमी असलेल्या मुलींचा गट तयार झाला होता. ही सर्व पार्श्वमूमी लक्षात घेऊन, गर्भपाताचे वेगवेगळे पैलू अगदी सोप्या भाषेत व सोप्या पद्धतीचा उपयोग करून समजावण्यात आले. यामध्ये सर्वांचे विचार आधी लक्षात घेऊन, समज/गैरसमज यावर चर्चा करण्यात आली. शास्त्रीय आधारावरची माहिती देखील खूप चांगल्या प्रकारे सांगण्यात आली. यालाच जोडून सामाजिक व्यवस्थेबद्दलची माहितीपण उपयुक्त ठरली.

सहभागासाठी अनुमती घेण्याबद्दलच्या नीतीमूल्यांवर जो विशेष भर दिला गेला हे फारच महत्त्वाचं वाटलं. याचबरोबर जो काही सराव (गटचर्चेचा, मुलाखतींचा, सर्वेक्षणाचा, निरीक्षणाचा) देण्यात आला तो ही अतिशय उपयुक्त ठरला.एकमेकांकडून काही ना काही शिकण्याची संधी मिळाली. इथं आलेल्या प्रत्येक व्यक्तीमध्ये असे काही गुण होते की ते आत्मसात करावेसे वाटले. खरं तर हे ट्रेनिंग फक्त प्रकल्पापुरतं मर्यादित नसून भरपूर काही शिकवून गेलं असं वाटलं. स्वतःमध्ये, सर्व दृष्टिकोनात फरक पडला असं वाटलं.

**.....गार्गी**

# माणसं किती छान, सुंदर असतात ! .....

येथे आल्यावर परिस्थिती जशी असेल त्याप्रमाणे जगायला शिकले. तसं पाहिलं तर हॉस्टेलमुळे जुळवून घ्यायची सवय होती. परंतु बाहेरच्या जगात दुसऱ्या लोकांबरोबर मी एकदम व्यवस्थित राहू शकते या विश्वासाने जन्म घेतला. फिल्डमध्ये सुरुवातीलाच मला भीती वाटायची ती फक्त 'माणूस' या प्राण्याची. माणूस म्हणण्यापेक्षा पुरुष म्हटलं तर अधिक सोपं होईल. बलात्कार, अपहरण, हिंसाचार एवढेच गुण पुरुषात असतात असं वाटायचं. आम्हा मुलींचा ग्रुप गावात गेल्यावर शाळा, अंगणवाडी, ग्रामपंचायत जे मिळेल त्यात राहायला तयार असायचो. पण मनात एक शंका कायम असायची रात्री कुणी येऊन आपल्याला काही केलं तर.......? परंतु ही भीती केव्हा आणि कुठे निघून गेली हे काम करताना लक्षात देखील आलं नाही.

एकदा आमच्या ग्रुपमधील आम्ही तिघी जणी तारणा या आदिवासी गावी जाण्यासाठी निघालो. आधीच्या गावातून संध्याकाळी साधारण ६ वाजता गाडी होती. एसटी लेट झाल्याने ती रात्री ८ वाजता आली आम्ही तो प्रवास रद्दही करू शकलो असतो. परंतु उद्याचा दिवस वाया जाऊ नये म्हणून आज जाऊन गावात मुक्काम केला म्हणजे सकाळीच कामाला सुरुवात करता येईल या विचाराने निघालो. गाडी दाट जंगलातून आणि दाट अंधारातून जात होती. नक्षलवादी भाग असल्याने माझ्या मनात थोडी भीतीच होती. रस्त्यात गाडी अडवून नक्षलवादी आम्हाला पळवून तर नेणार नाही. आधीच्या गावांमध्ये नक्षलवाद्यांविषयी भरपूर ऐकले होते. ते लोक माणसांना झाडाला बांधून त्यांचे हात-पाय तोडतात. हे आठवून भीती वाढतच होती. गाडीतील एक-एक प्रवासी करून सर्वच जण आपापल्या स्टॉपला उतरले. घड्याळात पाहिलं तर रात्रीचे अकरा वाजत होते. गावात जाऊन कोणाकडे राहायचे आता ना दवाखाना उघडा असेल ना अंगणवाडी या विचाराने आणखी टेन्शन आले. गाडी रिकामी असल्याने आम्ही बसल्या जागेवरून दोन-तीन फूट उडत होतो. कधी उजवीकडे धडक तर कधी डावीकडे. रस्ता एकदमच खराब आणि कच्चा होता. सरीता मागच्या सीटवर झोपली आणि धाडदिशी खाली आदळली. एक क्षणभर आम्ही हसलो आणि पुन्हा शांत झालो. एकदाचं आम्ही शेवटच्या स्टॉपला म्हणजे 'भावडी' या गावी उतरलो इथून तारणा आणखी ११ कि.मी अंतरावर आणि तिथे जायला काही सोय नाही. रात्रीचे बारा-साडेबारा झाले. आंध्रप्रदेशच्या सीमेवर असणाऱ्या या गावात कोणालाही हिंदी किंवा मराठी येत नव्हतं. कोणाला जाऊन उठावायचं आणि बोलायचं तरी काय? आमच्याबरोबर कंडक्टर आणि ड्रायव्हर यांनाही कुणाला तेलगू येत नव्हतं तेही आमच्यासारखेच गाव एकदम शांत झोपलं होत आणि इथं आम्ही बसमधून सामान बाहेर काढून त्या सामानावर बसून विचार करत होतो. तेवढ्यात कंडक्टरनेच आम्हाला सुचविले की ही गाडी मुक्कामी आहे. तुमचं नशीब की आम्ही दोघंही चांगली माणसं लाभलो. दुसरं कुणी असतं तर तुमचं काही खरं नसतं (मनात कंडक्टरचा रागच आलेला पण काही बोलताही येत नव्हतं.) सकाळ होईपर्यंत एसटीत झोपा. काहीच पर्याय नसल्याने आम्ही तिघींनी एसटीत झोपण्याचा निर्णय घेतला. या ठिकाणी आमचा धाडसीपणा जास्तच टेन्शनचा ठरला. तिघींपैकी रात्रभर तर कुणी झोपलो नाही तर कंडक्टर आणि ड्रायव्हर काय-काय बोलताहेत याचा कानोसा घेत राहिलो. आपण एखाद्या गोष्टीचा उगीचच उहापोह करत असतो. पण त्याचं काही होत नाही, एकतर अवेळी कुठे प्रवासाला निघू नये. आणि माणसं विश्वासू असतात याचा आनंद लुटावा.

दुसऱ्या दिवशी आमच्या कामाला सुरुवात झाली. या गावातून ट्रान्सलेटर न्यायचे असल्यामुळे आम्हाला रोज अप-डाऊन करावे लागले. कारण ट्रान्सलेटर मुक्कामी राहण्यास तयार नव्हते. दवाखान्यात (सरकारी) राहण्याची आणि आधी गावात एका शिक्षकांबरोबर ओळख झाली होती. त्यांचं इथे घर होतं तिथे जेवणाची सोय झाली. गावात नवीन कुणी तरी आलंय हे गावकऱ्यांच्या नजरेतून सुटत नव्हतं. बोलायच खूप असायचं पण भाषा आड येत होती. थोडीशी बोली भाषा एक दोन वाक्य आम्ही शिकलो होतो तेवढेच त्यांच्याशी बोलायचो त्यांना आनंद व्हायचा आणि आम्हालाही.

सेहतमध्ये मी एका कुठल्या प्रसंगामुळे शिकले असं नाही तर सतत मला नवीन शिकायला मिळालं आहे. प्रत्येक व्यक्तीकडे माणूस म्हणून पहायला शिकले. माणूस किती छान, चांगला, सुंदर असतो. हे खूप जवळून अनुभवायला मिळालं. पहिल्यांदा तर वाटायचं आपलं आपलं शेडयूल भरलं, ठरवून दिलेलं काम केलं म्हणजे झालं. पण जे काम करते त्याचा आस्वाद कसा घ्यायचा, त्या कामात किती मजा असते, आपण ते काम किती चांगल्याप्रकारे करू शकतो हे मला कळू लागले. फिल्डमध्ये काम करताना लोकांच्या एकदम जवळ गेले. त्यांची ती परिस्थिती, ते आयुष्य, घरातील प्रश्न, आजार, मानसिक ताण आणि त्या ताणाने लोकांवर होणारे परिणाम हे सर्व पाहून मन उदास होऊन जायचं. हे सगळं मला नवीन नसलं तरी आत्ता खूप त्रास होऊ लागला. आणि मनात वाटू लागलं की सेहतने या लोकांसाठी काहीतरी केले पाहिजे. आपण लोकांच्या जवळ जाऊन त्यांच्या दुःखाची जाणीव करून देतोय. एकतर लोकांच्या जवळ जाऊ नये नाहीतर यासाठी मार्ग सुचवावा. नंतर विचार करून मला कळले की ही परिस्थिती काही आपण एकट्याने बदलू शकत नाही. ही समाज व्यवस्थाच अशी आहे. निदान हे आपल्याला समजलंय तरी. ही एक चांगली दृष्टी मला या कामातून मिळाली. इथूनच मी हे शिकले की माणूस कधीच वाईट नसतो. माणसांला त्याची परिस्थिती वाईट बनवत असते. आधी वाटायचं ही व्यक्ती अशी वागते ना ? म्हणजे ती तशीच असणार. परंतु मी आता असा विचार करते की ही व्यक्ती अशी वागते तर ती अशी का वागते? त्याची कारणं शोधण्याकडे माझं मन वळत आणि ती कारणं सापडल्यावर आपण त्या व्यक्तीला कधीच दोषी ठरवू शकत नाही. काम करत असताना खूप चांगली लोक भेटली. तारणा मधील दोन आज्या तर खूपच गोड होत्या. आम्ही त्या गावात पहिल्यांदा गेलो तेव्हा संध्याकाळ झालेली. थंडीचे दिवस असल्याने आजी शेकोटी करून बसलेल्या. एकदम स्मार्ट अशा आजींचा पोषाख गुडघ्याच्याही वर. फक्त कंबरभोवती साडी आणि ब्लाऊज. तेवढ्या कडाकाच्या थंडीतही तेवढेच कपडे आणि ह्या आजीच्या केसाचा बॉयकट होता. एकदम हसऱ्या. आम्ही शेकोटी जवळ गेलो म्हणून त्यांनी मोठ्ठ लाकूड पटकन तोडलं आणि मोठी शेकोटी पेटवली. तुरीच्या शेंगा त्यांनी शिजवून दिल्या. खूप प्रेमळ वाटत होत्या. भाषेमुळे आमचा संवादच होऊ शकला नाही. अशाच दुसऱ्या आजींची मुलाखत घेतल्यावर त्यांना एकदम भरून आलं. त्या माझ्या पाया पडू लागल्या. जवळ घेऊन म्हणाल्या, "माझी परिस्थिती इतकी वाईट आहे की मी तुला चहा पण देऊ शकत नाही. माझ्याकडे मला शेतातून दिलेली भाजी आहे ती तू घेऊन जा". आजीच्या घराशेजारीच तिच्या चार मुलांची घरं होती. सगळे वेगवेगळं राहत होते. आईला कुणी सांभाळत नव्हतं. आजीचा नवरा गेल्यावर्षी रानात गुरं वळायला गेला आणि तिथेच मरून पडला. तेव्हापासून आजी एकट्या पडल्या होत्या. वाईट वाटण्यापलीकडे काही करता येत नव्हतं. खरंच ते गाव एकदम सही होतं. हिरव्यागार डोंगरात वसलेलं. ५०-६० घरांचे आदिवासी गाव. लोकं इतकी प्रेमळ की बस्स निसर्गात राहून निसर्गाएवढं प्रेम करत होती.

सेहतला रूजू झाल्यावर नव्या-जुन्या मैत्रिणी म्हणायच्या, "शकु तू आपली आर्मीतच जा, ह्या कामाच्या भानगडीत पडू नकोस". पण हे सर्व सुंदर आणि जिवंत अनुभव घेत असताना माझं 'आर्मी'च स्वप्न कुठे विरून गेलं माझ्याही लक्षात आलं नाही. आता पुढे काय करायचं हा मोठा प्रश्न माझ्यापुढे उभा आहे. कारण सर्वच क्षेत्रातील अनुभव आल्यासारखे वाटतात. आता पुढे मनात (भविष्यासाठी) ना इच्छा आहे, ना स्वप्न रंगवावेसे वाटते.

**.....शकुंतला**

# आत्मविश्वास वाढला.....

मी, ज्योती आणि मनिषा जेव्हा पहिल्या वेळेस लिस्टिंगला गेलो तेव्हा आम्हाला जेवढी गावं दिली होती तेवढी पूर्ण झाली. त्यानंतर आम्ही पुण्यात येणार होतो. परंतु जेव्हा ऑफिसमध्ये फोन केला त्यावेळेस आम्हाला अजून पुढची गावं देण्यात आली त्यामुळे थोडंसं वाईट वाटत होतं. त्यानंतर मी आणि ज्योती आम्ही आमच्या मनाची तयारी केली की थोडीच गावं आहेत, होऊन जातील आणि आपण मग पुण्याला येऊ. परंतु आमच्या इतकी तयारी मनिषाची झाली नव्हती. ती नेहमी आम्हाला म्हणायची आपण पुण्याला जाऊ वगैरे. आम्ही तिला समजावून सांगायचो पण तिच्या मनाची काही केल्या तयारी होत नव्हती. खूप प्रकारे तिला धीर देण्याचा प्रयत्न करत होतो. असं करत करत आम्ही हिंगणगाव येथील लिस्टिंग केले. मनिषा अस्वस्थ होती. तिला घराची खूप ओढ लागली होती. दुसऱ्या दिवशी आम्ही पुढच्या गावाला जाण्यासाठी गंगाखेडच्या बस स्टँडवर आलो. त्यावेळेस ती जरा ठीक वाटली. आमची मस्करीही चालली होती. तेवढ्यात तिकडून पुण्याला जाणारी एक बस आली. तेव्हा मी आणि ज्योती, मनिषा तिघींचेही लक्ष त्या बसकडे गेले आणि मनिषा एकदम म्हणाली, “पुण्याची गाडी आहे. चला आपण तिघी पण जाऊयात”. मला व ज्योतीला ती मस्करी करत आहे अस वाटलं. म्हणून आम्ही तिला म्हणालो, “हो, चल चल”. आणि तिनं खरचं बॅग उचलली आणि जायला निघाली. आम्हाला वाटलं की ती कसली जाते, उगीच मस्करी करत आहे. बसच्या दरवाज्यापर्यंत जाईल आणि पुन्हा येईल. म्हणून आम्ही खूप हसत होतो आणि ती काय करते ते पहात होतो. पण ती जेव्हा गाडीत बसली त्यावेळेस आम्हाला विश्वासच बसला नाही. तरीसुद्धा असं वाटतं होतं की आता गाडीत ड्रॉयव्हर नाही तोपर्यंत बसेल आणि नंतर येईल परंतु तसं काही झालं नाही. गाडी सुरू झाली आणि तिने गाडीत बसल्यानंतर आमच्याकडे पाहिलं सुद्धा नाही. तेव्हा ज्योतीला आणि मला क्षणभर काहीच कळलं नाही. आम्हाला काही सुचतचं नव्हतं. थोडा वेळ शांत बसून आम्ही ठरवलं की ठीक आहे. आपण तरीसुद्धा पुढची गावं करायची आणि जी काही परिस्थिती येईल त्याला दोघींनी निभावून न्यायचं. आम्ही ते सुद्धा करून दाखवलं. त्यावेळेस याची जाणीव झाली की आपल्याला जर एखादी जबाबदारी दिली तर ती आपण पार पाडू शकतो आणि त्याचवेळेस आत्मविश्वासही खूप वाढला.

**.....वैशाली स.**

# काम आहे, तर त्रास होणारचं! .....

सेहत मध्ये काम करताना असे अनेक प्रसंग आले की ते नकळत काही ना काही सांगून गेले. अगदी सुरुवातीचं ट्रेनिंग, नंतर फिल्डवर्क आणि त्यानंतर कोडींग या तीनही टप्प्यात काम करताना असे अनेक अनुभव आले.

आम्ही केंदूर गावात काम करत होतो. ते गाव कुठे सुरू होते आणि कुठे संपते हे सांगणे कठीणच होते. अगदी लांब लांब डोंगरात कुठेतरी एखादी लहान वस्ती. फक्त लांब लांब जाणारे रस्तेच दिसायचे. दोघी- दोघीमध्ये वस्त्या वाटून घेतल्या आणि कामाला सुरुवात केली. एका वस्तीवरून दुसऱ्या वस्तीत जायला रस्ता असेल तर लहान मुलाला घेऊन किंवा विचारत विचारत पुढच्या वस्तीत जायचो. एकतर रस्त्यात कोणाचे घरही नसायचे. फक्त चढ उताराचे डोंगर. ते दिवस पावसाचे नव्हते. पण दुपारी भरपूर ऊन व ४-५ वाजता अचानक खूप पाऊस आला. आम्ही ज्या घरी राहात होतो तिथपासून खूप लांब गेलो होतो. वारा ही खूप जोराचा येत होता. त्यामुळे पळताही येत नव्हते. दर्शना आणि मी दोघी होतो. डोंगरावर एक पडलेलं देऊळ होतं तिथं आम्ही आडोशाला थांबलो. एकतर संध्याकाळ व्हायला आली होती. ग्रुप मधील इतर मुली कुठे असतील हेही माहीत नव्हतं. पाऊस कमी झाल्यानंतर घरी आलो. माधुरीताई आमची खूप वाट पाहत होत्या. काही जणी आल्या होत्या तर काही जणी येणार होत्या प्रत्येक जण हेच सांगत होते की पावसामुळे कशी फजिती झाली. त्या कशा घाबरल्या. स्मिताच्या हातावर तर पावसामुळे मोठमोठे फोड आले होते.

हे सगळं होत असताना मी एक सारखा विचार करत होते की हे मी का करते? इतके कष्ट कशासाठी? कष्टापेक्षा जास्त भीती वाटत होती. त्या क्षणाला मी विचार करत होते की पुण्याला जावं. पुन्हा नोकरी करायची नाही. पण सगळ्यांनाच तो त्रास होत होता त्यामुळे मी हे कोणालाच सांगितलंही नाही.

केंदूर गावातील काम पूर्ण झालं. आम्ही पुढच्या गावाला जायला निघालो तेव्हा मी मनातून खूप घाबरले होते, पुण्याला जायचा विचार करत होते हे मी पूर्णपणे विसरलेही होते. पुन्हा पूर्वीसारखी झाले होते. हे आजही आठवलं तरी मी एकटीच हसते.

माणसाला जेव्हा खूप कष्ट पडतात सहन करण्याची वेळ येते त्यावेळेस माणूस नेहमी पर्याय शोधत असतो. त्यात आपण कसे चांगले राहू याचा विचार करतो. काही वेळेस तो पर्याय योग्य नसतोही. केंदूर गावात मी तेच केलं. पण असा पर्याय शोधणं म्हणजे आलेल्या प्रसंगातून पळ काढणे म्हणजे बावळटपणा आहे. हे मला ते गाव सोडतानाच समजलं. एखादा प्रसंग होऊन गेल्यानंतर त्याचा किती त्रास झाला ह्याचे आपल्याला काहीच वाटत नाही. तरीही ते काम आपण पूर्ण केलं याचा आनंदच होतो. फिल्डमध्ये असे खूप अनुभव आले, पण नंतर मात्र आपण हे करू शकलो याचा आनंद जास्त व्हायचा. त्यामुळे आजही एखादं कष्टाचं काम असेल तर, 'काम आहे त्रास होणारच असं वाटतं' जसं की उन्हात गेल्यावर ऊन लागणारच! हे अगदी सहज होऊन गेलं आहे.

**.....सविता**

# परिस्थितीशी सततचा झगडा.....

बादलवाडी हे एक लहानसं खेडं. तेंदूच्या पानापासून विड्या बनवणं आणि शेती हे इथले प्रमुख व्यवसाय. या व्यतिरिक्त बरेचसे लोक बिगारी कामावर उदरनिर्वाह करणारे होते. अशाच एका कुटुंबाची मुलाखत घेण्यासाठी गेले असताना घरातल्या लोकांशी संवाद साधण्याचा प्रयत्न केला. पण उत्तरच मिळत नव्हतं थोड्या वेळात कुटुंबप्रमुख सासरे आले, त्यांनी घराची माहिती दिली. त्यांच्या पत्नी थोड्या रागावलेल्या दिसल्या. पण कारण कळेना. थोड्या वेळानं त्यांच्या सुनेची मुलाखत घ्यायला सुरुवात केली. बाई अत्यंत कृश काळ्यासावळ्याश्या होत्या. अत्यंत चपखलपणे गोधडी शिवत बसल्या होत्या. तशाच अवस्थेत मुलाखतीला सुरुवात केली. सुरुवातीचे प्रश्न विचारेपर्यंत त्यांची सासू शेजारी बसली होती.

नंतर मग विशेष काही नाही असं पाहून निघून गेली. मुलाखती दरम्यान असं लक्षात आलं की त्यांचा गर्भपात झालाय. तो कसा झाला? तर म्हणाल्या 'आपोआप.' मग अनेक प्रश्न भरून घेईपर्यंत काही कळलं नाही. मग आपणहून म्हणाल्या ' हे मूल पडलं नसतं. पण काय करू नवरा कामाला जात नाही. सासूला आधीच आम्हा तिघांना (नवरा, त्या आणि त्यांचा मुलगा) खायला घालायला लागतं. त्यात मला दिवस राहिले हे कळलं असतं तर त्यांनी आणखी त्रास दिला असता म्हणून बाई मी बालवाडीच्या बाईंनी दिलेल्या गोळ्या तीन दिवसात संपवल्या आणि मग हा गर्भ पडला.'

हे ऐकल्यावर मी सुन्नच झाले. कारण ते मातृत्व त्या बाईला नको होतं असं नाही. तर त्याचा त्रास कुणाला तरी काढायला लागेल म्हणून त्यांनी ते नाकारलं. ते नाकारत असताना स्वतःच्या जीवाचाही विचार केला नाही. शिवाय नवऱ्याला काम होत नाही म्हणून बाई शेतावर बिगारीनं कामालाही गेल्या. अशा अवस्थेत की जेव्हा त्यांना उठून चालणं अशक्य होतं. एवढं असूनही घरातील एकाही माणसाची सहानुभूती किंवा प्रेम त्यांना मिळत नव्हतं.

ते सगळं ऐकल्यावर असं वाटतं होत की ह्या बाईसारख्या आज असंख्य स्त्रिया असतील की केवळ आपल्या परिस्थितीशी झगडत त्यांना असे अनेक निर्णय घ्यावे लागतात, जे त्यांच्या जीवावर बेतणारे असतात.

या बाईंच्या निमित्ताने आजच्या परिस्थितीत पैसा हे मूळ कसं आणि कुठवर खोल रूतलंय याचा अनुभव आला. शिवाय जीवन जगताना त्या बाईची बाई म्हणून, आई म्हणून, बायको म्हणून, जी काही दैना होते ती निराळी. अशा अनेक प्रसंगातून जाऊनच माणसं स्वार्थी होतात.

.....तृप्ती

# माळवाडीतले सरपंच 'बाबा'.....

माळवाडी या गावी आमचं काम होणार होतं. आमच्यातील काही मुली पुढे गेल्या होत्या. माझ्या मैत्रिणीची तब्येत ठीक नव्हती. म्हणून आम्ही दोघी मागून गेलो होतो. पुढे गेलेल्या मैत्रिणींनी तोपर्यंत गावात जाऊन माजी सरपंचाच्या घरी रहाण्याची सोय केली. तेव्हा त्यांनी स्पष्ट सांगितले की आमच्याकडे स्वयंपाक करणारं कोणीही नाही. परंतु सोय कुठंही होत नाही, इथं झाली व मिळेल तसं काम वाटून करू असा विचार करून तिथं रहाण्याचे ठरविलं. ते गृहस्थ म्हातारे होते, त्यांनाही बरं वाटलं.

तशी संध्याकाळच झाली होती. आम्ही सर्वांनी कामं वाटून घेतली काहिंनी घर साफ करून जेवणाची व्यवस्था केली. त्यावेळेस स्टोव्हवर व चुलीवर स्वयंपाक करण्याचीही संधी मिळाली, मज्जा वाटली व आमच्यासमवेत रात्री बाबांनाही जेवायला वाढलं हे पाहून त्यांचं मन भरून आलं. आम्ही त्यांना "बाबा" म्हणतो हे ऐकून त्यांना खूप बरं वाटलं. ते असंही म्हणाले की त्यांचा मुलगा व त्याची बायको इथून गेल्यापासून एकटं वाटत होतं. पण तुमच्यामुळे मी एकटा आहे हे मी विसरूनच गेलो होतो. त्यांच्या बोलण्यातून मुलगा घरातून गेल्यापासून ते खूप दुःखी आहेत व वृद्धावस्थेत आधाराची गरज असते अशा वेळेस ते एकटे आहेत, हे कटाक्षाने जाणवत होतं. आम्ही दोन दिवस त्या गावात होतो त्या दोन दिवसात आम्ही त्यांची व त्यांनी आमची काळजीही घेतली. आपलंच घर असल्यासारखं वागलो.

तिथून निघण्याच्या आदल्या दिवशी आम्ही त्यांना आमची आठवण व भेट म्हणून शाल आणली. संध्याकाळी एकत्र येऊन त्यांना दिली व त्यांच्या समवेत फोटोही काढला. आम्ही जाणार याचं त्यांना फार दुःख झालं असून काही दिवस रहा असा त्यांचा आग्रह होता. परंतु कामामुळे आम्हाला रहाता येणार नाही. परंतु असाच येण्याचा प्रसंग आला तर तुम्हाला भेटण्यास नक्की येऊ असं त्यांना सांगितलं, पत्र पाठवू असंही सांगितलं.

दुसऱ्या दिवशी निघाल्यावर कोपऱ्यापर्यंत ते आम्हाला सोडायलाही आले होते. त्यांचा आशिर्वाद घेऊन बाहेर पडताना त्यांच्या डोळ्यात आलेले आपुलकीचे प्रेमळ अश्रू व निघण्याचे दुःख मी माझ्या आयुष्यात कधीच विसरणार नाही. आमचं व त्याचं काहीच नातं नसतानाही दोन दिवसात एवढा जिव्हाळा निर्माण झाला होता. माझं मनही भरून आलं होतं. नकळत पाऊले जड झाली होती. त्यावेळेस मनापासून देवाला प्रार्थना केली की "यांचा मुलगा पुन्हा यांच्याकडे रहायला येऊ देत, या वृद्धावस्थेत त्यांना एकटं टाकू नकोस." निरोपाच्या अश्रूंची मला नेहमीच आठवण राहील.

**.....स्मिता श.**

# बाहेरच्या जगाची ओळख झाली.....

जाभंळीचा तो एक आदिवासी भाग होता. मला हे काम करण्याअगोदर आदिवासी लोकांच्या जगण्याच्या पद्धतीबाबत कसलीच कल्पना नव्हती. परंतु जाभंळीमध्ये काम करून त्या लोकांच्या संपर्कात राहून त्यांची चालरीत समजली. ते लोक इतक्या वाईट परिस्थितीत जीवन जगतात हे पाहून इतकं वाईट वाटलं की विचारायला नको. त्यांच्याकडे बघून असं वाटत होतं की त्यांच्या जगण्याला काही अर्थ नाही. देवाने जीवन दिलंय तर जबरदस्ती जगतात असं दिसत होतं. ती फार अज्ञानी लोकं होती. आम्ही जेव्हा पहिल्यादां सर्व्हेसाठी त्या भागात गेलो तर ती लोकं अक्षरशः दार बंद करून बसली होती. जेव्हा तिथल्या अंगणवाडीताईंना आम्ही त्याचं कारण विचारले तेव्हा त्यांनी सांगितलं की, 'ती लोकं डॉक्टरांना घाबरतात. तुम्ही डॉक्टर आहात असं समजून त्यांनी दारं बंद केली.' हे ऐकून आम्हाला फार आश्चर्य वाटलं.

शिवाय ती लोकं कच्चे म्हणजेच जिवंत खेकडे खात होती. जाभंळीला एक तळं होतं. त्यातले छोटे छोटे मासे व खेकडे पकडत होती. एक छोटा मुलगा जिवंत खेकडा तोडून खाताना मला उलटीच आली. मी स्वतःला सावरलं व पुढे गेले. तिथल्या बायकांना सहा सहा मुले असून सुद्धा त्यांचं बाळंतपण घरीच झालेलं असायचं. त्यांना दवाखान्याची गरजच पडत नव्हती. ती लोकं कितीही आजारी पडली तरी देखील ते आजारपण अंगावरच काढायचे. त्यासाठी ते दवाखाना करत नव्हते. विशेष म्हणजे इंटरव्यहू घेताना त्या बायकांना पाळीचा प्रश्न विचारला की त्या बायका अर्धवट माहिती देऊन पळून जायच्या पण त्या आदिवासी लोकांना प्रेम खूप होतं त्यांच्या घरी गेल्यावर त्यांना आम्हाला

कुठं बसवायचं हाच प्रश्न पडायचा. मग ते त्यांची अंगावर घ्यायची घोंगडी आम्हाला बसण्यासाठी टाकत होते. एका घरात मी पाणी मागितले तर त्यांना इतका हेवा वाटला त्यांनी तांब्या स्वच्छ घासला व पाणी दिलं. तो तांब्या त्यांनी माझ्यासमोर १५ मिनीटे तरी नक्कीच घासला. का? तर आम्ही पाणी पिणार म्हणून. त्याचं इतकं प्रेम बघून मला खूप भरून आलं.

यावरून मला समजलं की जगात किती अज्ञानी लोकं असतात. त्यांच्याकडे कसल्याही प्रकारची जमीन जायदाद नसते. दिवसभर कष्ट करून हे आदिवासी आपलं पोट भरतात. त्यामध्ये सुद्धा ते समाधान मानतात आणि आपण शहरी लोकं मात्र इतकी सुशिक्षित असून भरपूर इस्टेट असूनसुद्धा उद्याची चिंता करतो. आदिवासी लोकं त्यांच्या जीवनात आनंदी असतात आणि आपण सर्व काही असूनसुद्धा लोभी व हावरटपणाच्या आहारी जाऊन आपलं जीवन तणावग्रस्त करून घेतो.

यातून मला शिकायला मिळालं की नेहमी आहे त्यात समाधान मानून जगायला शिकलं पाहिजे. आपल्यापेक्षा श्रीमंत व्यक्ती पाहण्यापेक्षा आपल्याहून गरीब व्यक्ती डोळ्यासमोर ठेवायच्या. म्हणजेच जगात कितीतरी लोक अशी आहेत की त्यांना हात नाही किंवा पाय नाही. यांच्याकडे बघून असा विचार करायचा की निदान आपले शरीर व्यवस्थित आहे तीच आपली संपत्ती समजायला हवी.

सेहतमध्ये येण्यापूर्वी मी १२ वी ची परीक्षा दिली होती. तेव्हा माझं आयुष्य चार चौकटीच्या आतच मर्यादित होतं. मला घर ते कॉलेज या दोन ठिकाणांपैकी इतर कसलीच माहिती नव्हती जेव्हा मी सेहतमध्ये आले, तेव्हा मला हळूहळू सर्व गोष्टींची जाणीव होऊ लागली. माझ्या १२ वर्षाच्या शिक्षणामध्ये मी जे शिकले नाही. त्याचं ज्ञान सेहतच्या ट्रेनिंगमध्ये मला अनुभवायला मिळालं. माझं भाग्य म्हणावं लागेल की सेहत सारख्या संस्थेत मला काम करण्याची संधी मिळाली. सेहतमुळे माझ्या आयुष्याला वेगळं वळण मिळालं. माझ्या करीअरची खरी सुरुवात सेहतपासूनच झाली. या कामामुळे मला बाहेरचं जग अनुभवता आले. जगात कितीतरी वेगळ्या प्रकारची माणसे असतात.

इतक्या छान संस्थेत काम करतोय याचा आनंद तर होताच. शिवाय या संस्थेचं विशेष वेगळेपण सांगायचं झालं तर ट्रेनिंगपासूनच कळलं की संस्थेची प्रकल्प प्रमुख (सुनिताताई) व वर्कर (माझ्यासारखे) यांच्यात कसलीही दरी नव्हती. मला असं कधीच जाणवलं नाही की मी कोणाच्या तरी हाताखाली काम करते. माझी विचार करण्याची क्षमता सेहतमध्ये येऊन वाढली जर मी सेहतमध्ये काम केलं नसतं तर मला नाही वाटत मी सर्वांशी धीटपणे बोलू शकले असते. कारण दुसऱ्यांचा इंटरव्ह्यू घेऊन समोरच्या व्यक्तीशी कशाप्रकारे बोलायचं याचं ट्रेनिंग खूप छान झालं होतं. आता मी कुठेही एकटी जाऊन माझी कामं पार पाडू शकते.

सेहतमध्ये येण्यापूर्वीची पुष्पा फार वेगळी होती व सेहतच काम करून गेलेली पुष्पा पूर्ण बदलली आहे. जीवनातील प्रत्येक प्रश्नाला तोंड देण्याची ताकद माझ्यामध्ये सेहतमुळे आली.

**....पुष्पा जा.**

# जाभंळीचा अनुभव.....

जाभंळी पूर्ण आदिवासीचं गाव होतं. मोजकी १० घरं मराठ्यांची होती. गावाला १३ ते १४ पाडे होते व ते अतिशय लांब होते. गावातल्या अंगणवाडीताई, मदतनीस, शिक्षक म्हणाले की या गावात काय काम होणार नाही, त्यापेक्षा तुम्ही इथेच बसून काम करा. पण आमचं काम असं नव्हतं, पाड्यांवर गेल्यावर लोक आम्हाला बघून घाबरून जात. ते पळून जायचे. तसंच अंगावर ४ ते ५ कुत्री एकदम सोडायचे पण मदतनीस बाई बरोबर होत्या म्हणून तरी पुढे यायचे व नाव सांगायचे. त्यांची नावं पण समजायची नाही. कारण ती वेगळी होती. मदतनीसबाईच नाव सांगायच्या. गावात काम करताना खूपच त्रास झाला. दारू पिणारी लोक खूप होती. अडीच दिवस लिस्टींग करायला लागले.

नंतर माहिती घ्यायला गावात गेलो तेव्हा सुनिताताई बरोबर होत्या. शेड्यूल भरताना त्या लोकांना आमची भाषा कळत नव्हती. म्हणून अंगणवाडी ताईकडून त्यांचे शब्द शिकून घेतले. कधी वाटलं पण नव्हतं असं करायला लागेल. पण जवळ-जवळ निम्मा दिवस बसून त्यांच्याकडून पूर्ण शेड्यूलची भाषा शिकून घेतली. पावसाळा नुकताच संपल्याने गवत भयंकर वाढलं होतं. अगदी आपल्या डोक्याच्या वर व गावातील लोकांनी सांगितले की ह्या दिवसात साप खूप असतात व ते विषारी असतात. त्यामुळे आता काय तुम्ही पाड्यावर जाऊ नका, उन्हाळ्यात या. त्यामुळं खूप भीती वाटायची, जीव मुठीत घेऊनच कामाला निघायचो व त्या गवतातून जाताना वाटायचं की आता आपल्याला साप नक्कीच चावणार. पण असं काही झालं नाही, फक्त साप दिसले. असं वाटायचं की द्यावी नोकरी सोडून, पण नाही. ट्रेनिंग मधून खूप शिकलो. त्यामुळे हे विचार फक्त विचारच राहिले. ज्यावेळेस शेड्यूल भरायला खऱ्या अर्थानं सुरुवात केली, त्यांना संमतीपत्रक काहीच समजत नव्हतं व त्यांची सही घेण्याला सुद्धा काही अर्थ नव्हता. ते फक्त अंगठा द्यायचा म्हणून देत होते. तसंच विवाहित महिलांची मुलाखत घ्यायची होती. पण येथे तर लग्नाआधीच स्त्रियांना मुलं झाली होती. मग कशी माहिती घ्यायची? मुलाखत घ्यायची की नाही असाच प्रश्न होता. त्यांना स्वतःच वय काय असतं हे पण माहीत नव्हतं. विचारलं तर काय पण सांगायचे. त्यामुळे खूप प्रश्न पडत होता, त्यांना माहिती विचारताना अगदी सोप्यातल्या सोप्या मराठीत विचारावं लागत होतं, एक वेळ अशी यायची की आम्हालाच मराठीतील शब्द आठवत नव्हते.

तरीही आपण पोहोचत आहोत का? हा प्रश्न होता. त्यामुळे त्यांच्या संमतीला 'ज्ञात संमती' समजायची का? हा संशोधनाच्या नीतीमूल्यांचा प्रश्न होता. सुनितातार्ईशी चर्चा केली. यावर मार्ग कसा काढायचा याची खूप चर्चा झाली. प्रश्नावली शक्य तितकी त्यांच्या भाषेत करून मग या गावची माहिती घेतली. तरीही प्रश्नावली त्यांच्यापर्यंत किती पोहोचली ही शंका राहिलीच. पण या गावातून खूपच शिकायला मिळालं. लोकांची स्थिती कशी असते हे पाहिलं. या लोकांसाठी काही करता येत नाही याचं मात्र वाईट वाटतं. या सगळ्या गावांमध्ये काम केलं पण जाभंळी या गावाला मात्र कधीच विसरू शकणार नाही अजूनही तिथल्या मदतनीस बाईंची पत्रे येतात की आमच्या गावाला या.

**.....अश्विनी**

# स्वतःच्या सुरक्षिततेची काळजी....

फील्डवर्कची सुरुवातच होती आणि आम्ही तीन मुली लिस्टिंगसाठी गेलो होतो. शिरोली या गावाचे लिस्टिंग आम्हाला करायचं होतं. गावात जाण्यासाठी वाहनाची काहीही सोय नव्हती. आम्ही रेस्ट हाऊसमध्ये राहण्याची सोय करायचं ठरवलं. तेजवाडी या गावात होतं. पण तिथं आमची सोय झाली नाही. मग रहायचे कोठे? शिरोली गावात जाण्यासाठी वाहनाची सोय नाही. तेजवाडी गावात एक लॉज होता. तिथं आम्ही राहिलो. संध्याकाळी जेवण करून आम्ही फोन करायला गेलो. बाहेर सगळे मोठे मोठे ट्रक उभे होते आणि पुरुष लोक. आम्ही थोड विचारात पडलो. एकही बाई माणूस नाही. नंतर लक्षात आलं की लॉजवर बिअर बार पण आहे. मग फार भीती वाटायला लागली. आम्ही पटकन येऊन तिघी पण दार बंद करून झोपलो आणि तेवढ्यात लाईट गेली. रूमच्या एका खिडकीची काच फुटलेली होती. त्याच वेळेस हॉटेलच्या मालकाने दार वाजविलं, "झोपला का? दार उघडा", आम्ही सांगितलं "दार उघडणार नाही. रात्रीची वेळ आहे". थोड्यावेळानं पुन्हा तसंच झालं तिसऱ्या वेळेस ते म्हणाले, "दार उघडा पोलीस आले आहेत". आम्हाला वाटंल ते खोटं बोलतात दार उघडावं म्हणून, आणि नको त्या शंका मनात येऊ लागल्या. एकतर रात्रीचे ११.०० वाजले होते. इतक्या उशीरा पोलीसाचे काय काम? त्याच दिवशी आम्हाला बाहेर फिरताना खूप लोकांनी पाहिलं होतं. मग तर फारच शंका यायला लागल्या. नंतर एक पी.एस.आय. आले ते म्हणाले, "दार उघडा आम्हाला रूम चेक करायची". आम्ही म्हटलं "रात्रीची लेडीज रूम चेक करणं हा नियम नाही". आम्हाला तुम्हाला पाहायचं आहे. दार उघडा, आम्ही म्हटलं, "तुमच्या बरोबर कोणी लेडीज असेल तर आम्ही दार उघडू". ते पी. एस. आय. जाऊन एका लेडीज पोलिसाला घेऊन आले. म्हणाले "दार उघडा नाहीतर दार तोडून टाकीन". मग तेव्हा आम्ही जवळ जवळ तासाभराने दार उघडलं. आम्हाला खूप ओरडले, तुम्हाला माहीत आहे का इथं एक प्रकरण झालं आहे. त्या गावात पाचच्या सुमारास फायरिंग झालं होतं. कोणीतरी तीन मुली गोव्यावरून आल्या होत्या. आधी आम्ही कणकणवलीच्या रेस्ट हाऊसमध्ये राहून इकडे आलो होतो. त्या तीन मुली पण तिथं राहिल्या होत्या. म्हणून ते कणकणवलीचे पी.एस.आय तिथं आले आणि ते सगळे रेस्ट हाऊस, लॉज तपासत होते. आम्ही दार उघडत नव्हतो त्यामुळे त्यांना असं वाटलं त्या तीन मुली याच आहेत. मग त्यांनी आमचं आयकार्ड पाहिलं. संस्थेची माहितीपत्रक वाचलं. आमचं नाव व पत्ता लिहून घेतला. आम्ही काय काम करणार आहोत याची चौकशी केली आणि म्हणाले, "तुमची भरारी फार उंच आहे तुम्हाला जर स्वतःचं संरक्षण हवं असेल तर कुठल्याही गावात गेल्यानंतर तिथे किमान पोलिसांना तुम्ही या गावात आहात यांची माहिती तरी द्या. राहण्याची सोय व्यवस्थित ठिकाणी करा".

तेव्हापासून मात्र आम्ही फार काळजी घेतली. काहीही होऊ नये म्हणून राहण्याच्या सोयीची नेहमी सावधानता राखूनच काम केलं पाहिजे हे शिकलो. कोणतीही गोष्ट घडून गेल्यानंतर विचार करत बसण्यात काहीच अर्थ नाही, तर विचार करून मगच पाऊल उचलावं.

**.....अर्चना**

# 'जसं पेरतो, तसं उगवतं'.....

सेहतमध्ये झालेला आठ महिन्यांचा प्रवास बरंच काही शिकवून गेला. फिल्डवर्कमध्ये बऱ्याच वेगवेगळ्या स्वभावाच्या मुली भेटल्या. त्यांचे कडू गोड स्वभाव कळले. एकत्र काम करताना मिळणारा आनंद आणि कधी कधी होणारी भांडणं ही लक्षात राहून गेली. तसंच काम करताना बऱ्याच स्त्रियांशी संबंध आला. त्यांच्याशी बोलताना त्या अगदी आत्मियतेने बोलत होत्या. प्रत्येकीची काही ना काही आठवण अगदी कायमची मनात राहिलेली आहे. त्यापैकी एका बाईची व्यथा मला सांगावीशी वाटते.

कुरखेडा ह्या भागात आमचं काम चालू होतं. तिथं मला एका वृध्द बाईचं शेड्यूल भरावयास आले होतं. त्या बाई झोपडीवजा घरात एकट्याच होत्या. त्यांना कोणीही नव्हतं. मजुरी करत होत्या व त्यावरच आपलं पोट भरत होत्या. त्यांना एक मुलगा होता पण तो त्यांच्याकडे लक्ष देत नव्हता. कारण विचारता त्या म्हणाल्या, ' माझा मुलगा खूप चांगला आहे. पण माझ्या पापाची मी शिक्षा भोगते आहे.' मी म्हणाले, 'असे का म्हणता तुम्ही?' असे विचारल्यावर त्या म्हणाल्या, मुलाचे वडील वारल्यानंतर मी एका माणसांशी संबंध जोडले व मुलाकडे दुर्लक्ष झालं. त्यामुळे त्याचा राग हा योग्यच आहे. 'बाई, आपण जसं पेरतो तसंच उगवतं', असं म्हणून त्यांच्या डोळ्याला पाणी आलं.

त्या बाईला तारूण्याच्या ओघात केलेल्या चुकीबद्दल केवढी शिक्षा भोगायला लागत आहे. पोटचा मुलगा तिरस्काराने पहातो. त्याशिवाय आणखी कोणती गोष्ट सहन होणार आहे. कोणताही शरीराचा आजार नव्हता. पण मनाच्या आजारानं तिचं शरीर खंगून चालले होते. बाईने माझ्यापुढं मन मोकळं केलं पण मला मात्र आयुष्यभरासाठी धडा मिळाला.

.....**प्रभा**

# गावसभेमुळं सहकार्य मिळालं.....

फिल्डवर्कमध्ये आम्हा सहाजणींचा ग्रुप एकत्रित काम करणार होता. मुलींनी एकत्रित राहणं आणि संपूर्ण महाराष्ट्रातून फिरून निवडलेल्या घरात जाऊन महिला वर्गाशी बोलायचं, हे करताना वेगवेगळे अनुभव आले. संपूर्ण प्रवास सहा मुलींनी एकत्रित करायचा, बरोबर रहायचं ही एक फार मोठी जबाबदारी होती. पण सेहत मधून अगदी लहान सहान गोष्टीपर्यंत आम्हाला सर्व गोष्टींची पूर्वकल्पना दिली होती. सहा मुलींचे असे चार ग्रुप होते आणि सहापैकी प्रत्येकजणींच्या जबाबदाऱ्या ठरलेल्या होत्या. वेगवेगळ्या स्वभावाच्या मुली एकत्रित आल्याने प्रत्येकीत काहीतरी चांगले-वाईट, गुण-दोष, असतातच. कधीतरी एखाद्या वेळेस गैरसमज झाला तर भांडणही व्हायची. पण सकाळी आम्ही लवकर उठून आपल्या जबाबदारीचे फिल्डवर्क करून रात्री टीम-मिंटीग घ्यायचो. त्यामुळे काही जरी वागण्यात बदल पाहिजे असेल तर तो विषय रात्रीच्या मिटींग मध्ये व्हायचा. रेस्ट हाऊसचे पास काढणे, प्रवासाची चौकशी, कामाचे नियोजन हे टीम मिटींग मध्ये होत असल्याने सर्व काम नियोजनबद्ध होत होतं. ग्रामीण भागात काम करत असताना सुरुवातीला आम्ही सेहतची ओळख व आमची ओळख करून देत होतो. तसेच रक्तपांढरी व जन आरोग्यावरची पोस्टर आम्ही समजाऊन देत होतो.

गावात गावसभेच्या वेळी गावातील मंडळीकडून बरेच प्रश्न यायचे. त्यांच्या प्रश्नांची उत्तरे दिल्यानं, त्यांच्या मनातील शंका गेल्यानं गावातही वेगळंच वातावरण निर्माण होत होतं. तसेच गावातील लोकांचे खेळीमेळीचे वातावरण, त्यांनी आमच्या राहण्यासाठी केलेली सोय, त्यांनी दिलेला आदर हे फार महत्त्वाचं आनंददायी होतं. कधी कधी तर ग्रामीण भागात खूप चालावं लागतं. सकाळी महिला शेतात जातात म्हणून सकाळी लवकर उठून जावे लागत असे. कधी तर काम पूर्ण झाले नाही तर दोन शेड्यूडसाठी पुन्हा गावात यावं लागू नये म्हणून आधीच्या रात्री उशिरा थांबून आम्ही शेड्यूल भरत होतो. असाच एकदा रात्रीच्या वेळी भयानक अविस्मरणीय प्रसंग येऊन गेला.

नानीज हे एक बऱ्यापैकी मोठं गाव आहे. तिथं ८० टक्के मुस्लिम व २० टक्के हिंदू समाज आहे. लोकांचा व्यवसाय मच्छिमारी आहे. हिंदू लोक डोंगराळ भागी २०, २० घरांची वस्ती करून राहातात. गावातील काम झाल्यावर संध्याकाळी तीन शेड्यूल भरायची राहिली होती. दुसऱ्या दिवशीचा वेळ वाया जाऊ नये म्हणून संध्याकाळीच शेड्यूल

भरण्यासाठी म्हणून तिघीजणी निघालो. अंतराचा अंदाज नव्हता. एक किलोमीटरहून अधिक चाललो. बराच अंधार पडला. पण आता मागे फिरणं अशक्य होतं. काम पूर्ण करून जायचं होतं. आम्ही तिघींनी वेगळ्या-वेगळ्या दिशेने डोगंर चढायला सुरुवात केली. आवाजावरून एकत्रित येऊन डोंगर उतरून बोळी सारख्या रस्त्यावरील अंतर कापायला सुरुवात केली. पण तेवढ्यात फारच अंधार झाला होता. खूप घाबरलोही होतो. समोरून एक जीपगाडी येत होती तिचा प्रकाश म्हणजेच आमची सोबत होती. पण तीच जीपगाडी नंतर आमच्या दिशेने मागे जायला लागल्यानंतर आम्ही फारच घाबरलो. गाडी जवळ आल्यानंतर गाडीवाल्याने 'एवढ्या अंधारात कुठे जाता?' असं विचारलं. गाडीत बसा असं बोलल्यानंतर आम्ही कोणताही विचार न करता त्या गाडीत बसलो. फार आधार वाटला पण नंतर गाडी वेगळ्या दिशेने चालली. तिघीही इतक्या घाबरलो की बोबडीच वळाली. गाडी ड्रायव्हरला वाटलं की त्याच्याबद्दल आम्हाला शक येतोय त्यावेळी सात्वंनासाठी तो बोलला की, तसं अजिबात मनात आणू नका. खडकाळ मार्ग असल्याने मी इथल्या मार्गान गाडी घेतली. पण ठिकाण येईपर्यंत जीवात जीव नव्हता. जो काळासारखा वाटला तोच तर खरा सहकारी ठरला. त्या व्यक्तीला मी कधीच विसरू शकत नाही.

परळी वैजनाथ मध्ये मुलं लक्षं ठेऊन मागे लागली होती. रात्रीच्या वेळी दारू पिऊन आमचा मागोवा घेत त्यांनी रेस्ट हाऊस वर धूमाकुळ केला. आम्ही संरक्षणासाठी पोलिसांना फोन केला पोलिस खात्याने काडीचीही मदत केली नाही. पण दुसऱ्या दिवशी पोलिसांना आमची खूपच बोलणी खावी लागली.

**.....वैशाली सा.**

# प्रोत्साहन मिळालं, धाडस वाढलं.....

या कामात ग्रुपमध्ये वेगवेगळ्या विचारांच्या व्यक्तीमध्ये राहून काम करणं शिकले. विचार वेगळे असले तरी आपलं ध्येय कसं पूर्ण करता येतं हेदेखील शिकले. आपल्या लोकांपासून दूर राहून इतरांमध्ये आपलेपणा निर्माण करता आला. काम करताना एकमेकांप्रती बांधिलकी होती. त्यामुळे काम करताना कोणत्याही प्रकारची अडचण सहसा जाणवली नाही. प्रत्येकीच्या काम करण्याच्या पद्धतीतून, विचारातून खूप चांगल्या गोष्टी आत्मसात करता आल्या. प्रीती, अशी एक मुलगी आहे की तिच्याकडून मी फार काही शिकले. आमच्या ग्रुप मध्ये प्रीति खूप पटपट आणि न थकता काम करत असायची तिच्यामध्ये एक नीटनेटकेपणा, धाडसी आणि कोणतीही तक्रार न करता काम करण्याची वृत्ती होती. खूप मनापासून सर्व कामं करायची आणि असं काही नव्हतं की ती लिडर आहे म्हणून तिनं आमच्यावर रूबाब दाखवून काम करून घेतलं, असा तिचा स्वभावच नाही. आपलेपणानं आणि सर्वांमध्ये मिसळून सारख्याच प्रमाणात काम करणं प्रीतीकडून अप्रत्यक्षरित्या मी खूप शिकले. मला एक प्रकारे प्रोत्साहान देत असायची आणि माझे धाडस वाढवायची. वेळ प्रसंगी समजून सांगत असायची.

फिल्डमध्ये आम्ही एकदा नानीज गावात माहिती गोळा करत होतो. त्या गावात अगदी डोंगरावर काही घरं होती. तिथं माहिती घेण्यास आम्ही तिघी गेलो. गाव डोंगर किनारी असल्यामुळे लवकर अंधार पडला. लाईटस् पण नव्हत्या. त्यात माझी चप्पल तुटली. मग तिथंच एका मावशींच्या घरी दिव्याखाली सुई दोरा मागून चप्पल शिवली आणि पुढे गेलो. पुढे काम करून तिघी एकत्र येत असताना खूप अंधार पडला होता. तरीपण धाडसाने एकमेकींचे हात धरून येत होतो. अचानक एक जीप आमच्या समोरून पुढे गेली आणि परत रिव्हर्स घेत मागे आली. आम्ही खूप घाबरलो. भर भर चालायला लागलो. मग त्या माणसानं गाडीतून आवाज दिला आणि आम्हाला आपलेपणाने विचारले 'कुठे चाललात'. त्यामुळे थोडा धीर आला आणि त्या व्यक्तीने आम्हाला जीपमध्ये बसवून गावात बस स्टॉपवर सोडले. अगदी बस सुटेपर्यंत आमच्यासोबत थांबला. खूप धीर मिळाला. पुन्हा रात्र झाली की काम थांबवायचे आणि दुसऱ्या दिवशी उरलेले काम करायचे हे ठरवलं. हा क्षण माझ्या जीवनातील आणि फिल्डवर्क मधील अविस्मरणीय असा आहे.

**.....जागृती**

# अविस्मरणीय अनुभव.....

दुपारी आम्ही बादलवाडी गावात पोहचलो. तोपर्यंत ज्योती आणि स्मिताने लिस्टींग केलेले होते. आणि ह्या गावानंतर शेलीही येणार होती. तिला कुठे भेटायचे, पुढचे काय नियोजन असणार यासाठी आम्ही म्हणजे स्मिता आणि मी आम्ही दोघी साधारणतः ४-४.३० च्या सुमारास पुण्यात फोन करण्यासाठी बाहेर पडलो. या गावात फोन नव्हता. जवळच्याच गावात तो असल्याचे कळले आणि आम्ही दोघी तिथे निघालो. दोघीही छान बोलत बोलत लोकांना विचारत गेलो. शेजारचं गाव तसं लांब होतं. साधारणः ३ ते ४ किलोमीटर असेल. ३ ते ४ किलोमीटर चालणं तेव्हा तसं काही जास्त नव्हतं.

आम्ही या गावात पोहचलो. पुण्याला फोन केला. शेली कधी, कुठे भेटणार हे सर्व विचारले. पुढचे नियोजन ठरविलं आणि त्यांना पैसे देऊन बाहेर आलो, तेव्हा दोघीही हादरलोच. कारण अगदी काळोख पडलेला होता. जिथून आम्ही आलो होतो तिथे दोन्हीही बाजूला शेती आणि दाट झाडी होती. आणखी आम्ही टॉर्च आणण्याचंही विसरलो होतो. आणि परत जायचं कसं हा प्रश्न? तिथल्या एक ताईनी दोन मुलांना सांगितलं की या दोघींना बादलवाडी गावात सोडून या. आणि त्या दोघांनीही लगेच ऐकलं. त्यांनी सायकली घेतल्या आणि आम्ही चौघेजण जायला लागलो.

आम्ही दोघी मध्ये आणि ते दोघे आमच्या बाजूला असे आम्ही चालत जात होतो. दोघीही खूप घाबरलो होतो. एकमेकींचे हात घट्ट धरून ठेवले होते. आम्ही चालत होतो पण रस्ता काही संपत नव्हता. एकही जण त्या रस्त्यावर नव्हते. फक्त आम्ही चौघे जण चालत होतो. काही झालं तर? या मुलांनी काही केलं किंवा आणखी कुणी अचानक आलं तर? खूप भीती वाटत होती. मुलंही २०-२२ वर्षाची होती. आणि त्या ठिकाणी जर कुणी आम्हाला मारून टाकलं तरी कळणार नव्हतं इतका शांत रस्ता होता.

गाव जवळ आल्यानंतर डांबरी रस्ता लागला तेव्हा आम्ही त्या दोघांच्या सायकलीवर बसलो आणि त्यांनी आम्हाला गावात सोडलं आणि ते म्हणाले, "ताई तुम्ही आमच्यावर जसा विश्वास टाकून आलात तसं सर्वांबरोबर जाऊ नका. सर्व जण असे नसतात."

खरंच सर्व जण चांगले नसतात पण काही चांगलेही असतात, याचा अनुभव आला. असंही वाटलं, की कदाचित शहरामध्ये असा प्रसंग आला असता तर त्यातून वेगळेही निष्पन्न झाले असते. पण गावामध्ये मात्र सुरक्षित असल्याची भावना मिळाली. त्यामुळे गावातले लोक आणखीनच आपले वाटू लागले.

.....**दर्शना**

# उपेक्षितांचे दर्शन.....

मुंबई मध्ये फिल्डवर्क करणे ही खरोखरच आव्हानात्मक गोष्ट आहे. आमची व दर्शनाची अशा दोन टीम मुंबईमध्ये काम करत होत्या. आम्ही नेहमी प्रमाणे सकाळी पीएसयूचा नकाशा घेऊन लिस्टिंग करण्यासाठी गेलो. नकाशावरून तो पीएसयू साधारण पणे व्हीटी व भायखळाच्या मध्ये होता. सीमारेषा सोपी असूनही सापडायला बराच वेळ लागला. झोपडपट्टीचाच भाग होता. त्या परीसरात अतिशय कमी राहती घरे होती. वस्ती अतिशय गलिच्छ होती. सगळीकडून वेगवेगळे घाण वास, उघड्या नाल्या, सांडपाणी तिथेच बसलेल्या काही बायका, पत्ते खेळणारे पुरुष, इकडे तिकडे पळणारी व लोळणारी लहान मुले व आम्ही कोण व कशाला आलो आहोत? अशा नजरेने आमच्याकडे पाहणारे लोक बघून क्षणभर अंगावर काटाच आला.

दुसऱ्या दिवशी त्याच भागात लिस्टिंगला गेलो. तो पर्यंत माझ्या मनाला तिथल्या वातावरणाची सवय झाली होती. आम्ही लिस्टिंग करत असताना यादीमधील १३० घरांपैकी एक-दोन घरांमध्ये तृतीयपंथी एकत्र राहत होते. घरांची निवड करताना जर त्यांची घरे निवडली गेली तर मुलाखत घ्यावी लागणार होती. घरातील कुटुंबप्रमुखाचे नाव विचारताना त्यांच्यातील एकजण माळ्यावरून खाली उतरला. स्त्री वेषात असलेली तुलसी दिसायला अतिशय नाजूक गोड होती. हातापायाला तिने हळद लावलेली होती. मी प्रथमच अशा व्यक्तीशी बोलत होते. पण तिच्याशी बोलल्यानंतर मला त्यांच्या जीवनाविषयी अधिक जाणून घेण्याची इच्छा झाली. ते लोक नक्की कुठून येतात. एकमेकांना कसे भेटतात, गटात कसे काय सामावले जातात. त्यांच्या घरची परिस्थिती काय असते, त्यांचा उदरनिर्वाह कसा चालतो, त्यांचे सामाजिक व लैंगिक आयुष्य यांसारखे असंख्य प्रश्न माझ्या मनात एकामागून एक येऊ लागले आणि तेव्हाच मी ठरवले की जरी यांच्या घराची निवड झाली नाही तरी या लोकांशी आपण बोलून माझ्या मनात आलेल्या सर्व प्रश्नांची उत्तरे जाणून घ्यायची आणि योगायोग असा की तुलसीच्या घराची निवड झाली. मी पहिल्यांदा गेले तेव्हा घरी कोणीच नव्हते. म्हणून मी शेजारी निरोप ठेवला व दुसऱ्या दिवशी येईन असे सांगितले. गटातील सर्वच मुलींना त्यांची मुलाखत घेण्याची उत्सुकता होती. पण बाकी जणींना काही राहिलेल्या मुलाखती पूर्ण करायच्या असल्याने मी व पुष्पा

त्यांच्याकडे गेलो. आम्ही येणार म्हणून ते तिघे आमची वाट पाहत बसले होते. गेल्यावर मी आम्ही कशासाठी आलो आहोत, माहिती घेण्यामागचा आमचा उद्देश काय आहे. संस्थेविषयी माहिती सांगितली. तुलसी त्यांच्या गटात येऊन १० दिवस झाले होते, त्यामुळे गटात पूर्वीपासुन राहणाऱ्या एकाचे त्यांनी कुटुंब प्रमुख म्हणून नाव सांगितले व माहिती द्यायला सुरुवात केली त्यांची फक्त एकच प्रश्नावली (घराची माहिती) भरून घेता येणार होती. माहिती पूर्ण झाल्यानंतर मी तुलसीला माझ्या मनात आलेले प्रश्न विचारायला सुरुवात केली. मी जेव्हा तुम्ही काही काम का नाही करत विचारले असता त्यातील एकजण म्हणाला "तुझ्या घरी तरी तू हिजड्याला भांडी घासू देशील का?" मी या गोष्टीचा कधीच विचार केला नव्हता. त्या प्रश्नाने मी अगदी हेलावून गेले. मला काय उत्तर द्यावे तेच सुचेना. त्यावर तो म्हणाला, " ताई आमचे आई-वडील ही आम्हाला सांभाळत नाहीत, त्यांनाही आमचं ओझं वाटतं, तर समाज तर समाजच आहे. सगळ्यांसाठीच आम्ही धरणीला भार. भीक मागणारे, भिकारी वाटतो तर समाजातील लोकांनी आम्हाला चांगली वागणूक द्यावी अशी अपेक्षाच आम्ही करत नाहीं. त्यांनी जे काही दिलं, मग ते कुठल्याही स्वरूपात असो, आम्ही आम्हाला हवे इतके पैसे घेऊनच परत येतो." तुलसी ही त्या तिघांमधील सर्वांत जास्त म्हणजे सेंट झेव्हीयर्स कॉलेज मधून १२ वी झालेली व्यक्ती होती. त्यामुळे काही वेळा ती इंग्रजीतही बोलत होती. तिची कथा तर अतिशय करूण होती. तिच्या आईवडीलांनी तिला हाकलून दिले व ही घरात असल्याने त्यांची समाजातील प्रतिष्ठा कमी होते असे सांगून, तिला मारहाण केली व तिला चटकेही दिले. तुलसी त्यानंतर या गटामध्ये सामावली गेली व आता तिने त्यांच्याबरोबर राहाण्याचा निर्णय घेतला आहे. या लोकांबरोबर येऊन मला जगणे म्हणजे काय आहे ते समजले असे ती सारखे सांगत होती. ते तिघेही एकत्र राहत व स्वयंपाकही एकत्र करतात. तुलसी अजून वयानेही लहान असल्याने त्यांना छोटी-मोठी मदत करते.

सुरुवातीला अशा गलिच्छ वस्तीत आपल्याला दोन दिवस काम करायचे आहे असा विचार करून मला खूप टेंन्शन आले होते आणि या तिघांशी बोलता बोलता मी तिथेच पायऱ्यांवर बसून त्यांच्याशी गप्पा मारायला लागले ते मला समजलेचं नाही. आम्ही त्यांच्याबरोबर फोटोही काढले. ते तिघेही मला जेवून जाण्याचा आग्रह करत होते. त्यांच्याशी सुरुवातीला बोलताना माझ्या मनात एक थोडीशी भीती होती ती कधीच कुठल्या कुठे गेली होती आणि त्या दिवसानंतर आजपर्यंत कधीही मी या लोकांना पाहिले किंवा ते जर माझ्याशी बोलले किंवा त्यांनी हात लावून माझ्याकडे पैसे मागितले तर मला त्यांची ना कधी किळस वाटते ना भीती. तुलसी, पार्वती यांच्याशी बोलून मला तृतीयपंथी लोकांचं जीवन किती कठीण व भयंकर असतं याची जाणीव झाली. आणि एकदा का एखादी सत्यपरिस्थिती माणसाला कळली की त्याची भीती किंवा किळस वाटण्याचं काहीच कारण नाही. असं मला वाटतं. संपूर्ण सर्वेक्षणामधील मला आलेला हा अनुभव मी कधीच विसरू शकणार नाही.

.....**प्रीती**

# फील्डवर्कमधून मी वास्तव जीवनाला सामोरी गेले.....

कार्यक्षेत्रात आम्हाला विवाहित स्त्रियांच्या गरोदरपणाची माहिती जमवायची होती. अशाच एका मुलाखतीत माझी भेट एका स्त्रीशी झाली. तिच्या लग्नाला पाच वर्षे होऊन गेली होती. पण अजून तिची कूस उजवली नव्हती. जगात सगळीकडेच व विशेषकरून भारतासारखा पौर्वात्य देशात बाईचं मातृत्व विशेष महत्त्वाचं आहे. अर्थात हे मातृत्व विवाहांतर्गत बंधनातून आलेलं म्हणजेच कायदेशीर असलं पाहिजे! बाई कोणत्याही जात, वर्ग, धर्माची असो, कोणत्याही आर्थिक स्तरातली असो, नवविवाहिता असो वा अनेक बाळंतपणामुळे खंगलेली असो, प्रत्येक भारतीय स्त्री हेच मानते आहे की मातृत्व ही तिच्या आयुष्याची इतिकर्तव्यता, तिच्या अस्तित्वाचं अपरिहार्य कारण. आपल्या नवऱ्यापासून जिला दिवस राहात नाहीत तिचं जीणं समाज हरतऱ्हेनं मुश्कील करतो. तिचं आयुष्यच फोल ठरवलं जातं, तिची व्यक्ती म्हणून कुचंबणा होते आणि आता तुझ्या आयुष्याला अर्थ नाही - ही जाणीव तिला सतत करून दिली जाते.

मी या स्त्रीला भेटले, माझी ओळख करून दिली, येण्याचं कारणही सांगितलं. तिला दिवस राहतील यासाठी काय उपचार करता येतील, असं तिनं मला विचारलं. दिवस न राहण्याचा सारा दोष अर्थातच या बाईच्याच माथी मारला जात आहे. अजून तर तिनं व नवऱ्यानं तपासणीही करून घेतलेली नाही.

या अशा लोकांच्या दुःखाचा दैनंदिन भार आपण कोणत्याच प्रकारे हलका करू शकत नाही, यामुळे फिल्डवर्क करताना बऱ्याचदा उदासी दाटून यायची. समाजात विषमता आहे हे याआधीही मला माहीत होतं. पण पुस्तकात वाचून ते समजणं आणि प्रत्यक्ष जीवनातलं वास्तव दर्शन होणं, या दोन्हींचा परिणाम भिन्न आहे. मुंबईतील उंचच उंच इमारती समोरील फुटपाथवरही काही कुटुंबांनी आसरा घेतला होता. कचराकुंडी धुंडाळून जे मिळेल त्यावर ते बऱ्याचदा गुजराण करत. असं हलाखीचं जीवन जगणाऱ्यांसमोर मला माझी दुःखं एकदम अर्थहीन आणि छोटी वाटायला लागली.

**.....शेली**

# जगण्याची उमेद वाढवणारा अनुभव.....

सर्व्हेच्या निमित्ताने महाराष्ट्रातील काही भागांमध्ये फिरणं झालं. ह्या निमित्ताने अनेक लोकांशी जवळून संबंध आला. आयुष्यातील अनेक अनुभवांवरून लोकांवर माझा विश्वास होता. तो सर्व्हेतील अनुभवांवरून अनेक पटीने वाढला.

गावामध्ये रहात होतो. त्यामुळे सर्व्हेच्या अनुसूची व्यतिरिक्तही लोकांशी बोलणं होत होतं. ४-५ दिवस त्यांच्याच पद्धतीने आयुष्य जगत होतो. त्यातून आयुष्यातील अनेक प्रश्न समोर येत होते. यातून निराशा तर होत होती पण तरीही एक नवी ताकद मिळत होती, संघर्ष करण्यासाठी. ह्या समाजात माणसाला माणूस म्हणून जगणं किती मुश्कील आहे ह्याची तीव्र जाणीव झाली.

एका ताईची मुलाखत घेत होते. त्यांच लग्न इच्छेविरूध्द झालेलं. लग्नानंतर काही दिवसांनी नवऱ्याने त्यांना माहेरी पाठवून दिले व सगळे संबंध तोडून टाकले. माहेरी त्यांना नवऱ्याने टाकलेली म्हणून सर्वजण पाहू लागले. माहेरी श्रीमंती होती. पण भावाने वेगळी लहान खोली व थोडीशी जमीन दिली. सध्या आईबरोबर त्या ताई रहात आहेत. त्या सांगत होत्या गावातील लोक खूप वाईट नजरेनं पाहतात. काहीजण त्यांना 'नवऱ्याने टाकली, आता गावभर हिंडायला मोकळी' असं म्हणतात.

त्या ताईंनी काही मुलभूत प्रश्न विचारले. त्या प्रश्नांचा सर्वांनी विचार करणे आवश्यक आहे. नवऱ्याने सोडलेल्या बाईला कोणतीच शारीरिक भावना नसते का? आणि नसावी का? पुरुषाला काहीही करायला ह्या समाजात बंदी नाही. परंतु बाईबाबत मात्र असंख्य बंधने आहे. सगळी संस्कृती बाईच्याच माथ्यावर मारली आहे.

मला त्या ताईचा एक स्त्री म्हणून खूप अभिमान वाटत आहे. त्यांनी स्वतः निवडलेल्या सहचाऱ्याबरोबर संबंध ठेवण्याचा आणि तरीही स्वतंत्र जगण्याचा निर्णय घेतला, त्या निर्णयाच्या चांगल्या वाईट दोन्ही परिणामांना तोंड देण्याची तयारी केली आहे. स्वतःला ओळखून त्याप्रमाणे जगणे हे ह्या समाजात बाईला तर केवळ अशक्य आहे. अशा परिस्थितीत ह्या ताईसारख्या व्यक्ती भेटल्यानंतर एक उमेद मिळते.

**.....भाग्यश्री**

# स्वतःला घडवताना.....

आपल्या समाजात मुलींवर फार बंधनं लादली जातात. समाजात त्यांना मोकळेपणानं वावरू दिलं जात नाही. कोणत्याही प्रकारचं स्वातंत्र्य दिलं जात नाही. मुलींच्या सुरक्षिततेसाठी हे केलं जातं असं वाटत असलं तरी मुलीवरचा सतत कडा पहारा मुलींच्या विकासाला बंदिस्त करतो. त्यांच्या बौद्धिक, भावनिक, मानसिक वाढीला मारक ठरतो. ही बाब कळते पण वळत नाही या पठडीतली आहे. सेहतच्या संशोधन प्रकल्पात सहभागी झालेल्या मुलींना कार्यक्षेत्रातील कामामुळे बाहेरच्या जगात वावरायची संधी मिळाली. प्रशिक्षण, चर्चा व प्रत्यक्ष लोकांशी भेटणं यांतून वास्तवाचे अनेक पैलू उलगडले, नवे अनुभव गाठीशी जमा झाले. या नव्या शिक्षणाचं प्रतिबिंब त्यांच्या व्यक्तिमत्वावरही पडलं. स्वतःत काय बदल जाणवतात, ते सकारात्मक आहेत की नकारात्मक या व अशा मुद्दयांना धरून अन्वेषींच्या गटाशी चर्चा केली. प्रकल्पाचं काम संपून सुमारे एक वर्षाचा कालावधी उलटून गेल्यावर ही चर्चा केली. त्यातून त्यांच्या व्यक्तिमत्व बदलाची प्रक्रिया आणि गुंतागुंत समजाऊन घेण्याचा प्रयत्न केला.

## वास्तवाची जाणीव

गावागावातून फिरताना, लोकांशी बोलताना अन्वेषींना प्रखर वास्तवाचं दर्शन घडलं. त्यांची नजर केवळ सर्वेक्षणार्थी वा संशोधक म्हणून सीमित नव्हती. तर स्त्रियांच्या परिस्थितीकडे, गावातील समस्यांकडे त्या डोळसपणे, संवेदनाक्षमतेनं बघत होत्या, त्यातून त्यांना प्रश्न पडत होते, आपण ज्यांच्याकडून माहिती घेऊन येतो, आपण त्यांना काय देणार? लोकांची परिस्थिती अत्यंत हलाखीची. आपल्या अधिकारांबद्दल काय, पण सोयीसुविधा कशा मिळवायच्या याचीही त्यांच्याकडे माहिती नाही. अशा वेळी आपण केवळ माहिती देऊन काय साधणार आहे?

स्त्रियांचं आरोग्य किती दुर्लक्षित विषय आहे, ही जाणीवही प्रखरपणे झाली. लग्नानंतर दिवस राहिले नाही तरी त्रास होतो, दिवस राहिले तर मुलगा पाहिजे म्हणून अप्रत्यक्ष दबाव सहन करावा

लागतो, गर्भपात झाला तर तिच्या आरोग्याकडे लक्षच दिलं जात नाही! स्त्रियांना गर्भपाताचा अधिकार आहे. तथापि वास्तवातली गर्भपाताची कारणं स्त्रियांच्या विषम स्थानातून उद्भवणारी आहेत. नैसर्गिक गर्भपात होण्याचं प्रमुख कारण कष्ट, श्रम यांचा ताण आणि कुपोषण. कृत्रिम गर्भपात दुसऱ्या तिमाही मध्ये होतात. याचं कारण म्हणजे बहुतेकदा गर्भपात करायचा की नाही हा निर्णय घेण्यात एवढा वेळ निघून जातो. अथवा लिंगनिदान चाचणी करण्यात वेळ जातो. 'अनेक स्त्रियांचं आयुष्य जवळून बघता आलं. प्रत्येक मुलाखत नवी, स्वतःकडेही नव्या नजरेनं बघायला शिकलो', ही अन्वेषींची प्रातिनिधीक भावना आहे.

## आपण काय करू शकतो?

लोकांच्या रोजच्या जगण्यातले प्रश्न बघून त्यासमोर आपले प्रश्न किरकोळ वाटायला लागले, अशी भावनाही अन्वेषींनी व्यक्त केली. त्याचबरोबर 'आपण काही करू शकतो का?' ही भावनाही तितकीच प्रखर होती. एका परीने संशोधनाची ही मर्यादा होती. लोकांना प्रत्यक्ष मदत करणं वा नंतर त्या भागात काम करणं हे संस्थेच्या आवाक्यातलं वा नियोजनातलंही नव्हतं. अर्थात कोणत्याही मिषाने वा दिशाभूल करून त्यांच्याकडून माहितीही घेतली जात नव्हती. मुलाखत देणाऱ्या लोकांप्रती पूर्ण आदर बाळगून माहिती संकलनाचं काम केले जात होतं. तरी 'काहीतरी करावसं वाटणं' ही मुलींची भावनाही प्रामाणिक तळमळीतून आलेली होती. लोकांच्या हलाखीची कारणं काय, संदर्भ काय, प्रश्नांचं स्वरूप काय हे समजण्यासाठी अन्वेषींना व्यापक समाजवास्तवाचं भान आणि आकलन वाढण्याची गरज होती. त्यादृष्टीने या विषयी मुलींशी सातत्याने चर्चा करत असू.

## माहिती, ज्ञानाच्या परिघाबाहेर

मैलागणिक भाषा बदलते, तशीच संस्कृतीही. महाराष्ट्राच्या विविध खेड्यातून, पाड्यातून फिरताना भिन्न भिन्न प्रकारची संस्कृती आणि रितीरिवाजही समजून आले. आदिवासी भागात महुवाची दारू पेश करून पाहुणचार झाला! कारण कोणताही प्रसंग साजरा करण्याची आदिवासी स्त्री-पुरुषांची हीच प्रथा आहे. 'लाज' ही संकल्पना संस्कृतीविशिष्ट आहे याचा प्रत्यय एका गावात आला. बायका परपुरुषासमोर चेहेऱ्यावर पदर ओढून घेत होत्या, पण बाळाला दूध पाजताना छाती झाकत नव्हत्या. छाती उघडी बघणं सवयीचं नसलेल्या शहरी मुलींना ही विसंगती वाटली. पण तिथल्या लोकांना उघडी छाती खटकत नव्हती. कारण त्यांच्या लेखी बाळालां पाजायचं नैसर्गिक कामंच ही आई करत होती.

काही गावातील लोकांची अनभिज्ञताही चकीत करत होती. मुलं किती आहेत याची चौकशी सर्वेक्षणात केली जात होती. म्हणून कुटुंबनियोजनाचं ऑपरेशन करायलाच या मुली आल्या आहेत ही भीती काही ग्रामस्थांना वाटत होती. पाळीविषयी प्रश्न विचारायला लागल्यावर काही गावात स्त्रिया हसून त्यांची उत्तरे टाळत किंवा तिथून निघून जात. आरोग्याच्या प्राथमिक माहितीपासूनही कितीतरी लोक अद्यापही वंचित आहेत, याचेच हे निदर्शक आहे. तर काही गावातल्या राजकीय मंडळींनी त्यांच्या दृष्टिने प्रकल्पाच्या कामाला रंग दिला. 'आम्ही धर्मांतर करून घेण्यासाठी आलोय अशाही अफवा काही ठिकाण पसरवल्या गेल्या. अर्थात नंतर लोकांशी बोलून आम्ही त्यांचे गैरसमज दूर केले' एका अन्वेषीनं सांगितलं. जगातील माहिती, ज्ञान या खेड्यापाड्यातील लोकांपर्यंत कधी पोहोचत नाही. शिक्षणाच्या परिघाबाहेर राहिलेल्या लोकांना भेटणं स्वत:ला एक नवा धडा होता.

## सेहतविषयी

संस्थेनं दिलेलं प्रशिक्षण, इथलं मैत्रीपूर्ण वातावरण याविषयी सगळ्यांच्याच मनात आदर आहे. अर्थात सेहतची ती जबाबदारीही होती. ही जबाबदारी अधिक चांगल्यारितीने पार पाडण्यासाठी, काही त्रुटी राहून गेल्या असल्या तरी त्या समजण्यासाठी अन्वेषींचा प्रतिसाद महत्त्वाचा होता. प्रशिक्षणाचा भर विषयाची समज तयार करण्यावर होता. तुलनेनं प्रत्यक्ष कार्यक्षेत्रातील कामाची कौशल्यं तयार होण्यास कमी वेळ दिला गेला. उदाहरणार्थ, अनुसूची भरण्याचा अधिक सराव झाला असता तर प्रत्यक्ष काम सुरू केल्यावर कमी अडचणी आल्या असत्या. असं एकीच म्हणणं पडलं. कामापुरतं प्रशिक्षण द्यायचं हा सेहतच्या प्रशिक्षणाचा रोख नव्हता. तर संशोधनविषयाची समज व गटाची मैत्री भावना वाढावी हा हेतू होता. याचं महत्त्वही बऱ्याच जणींना वाटलं. 'प्रशिक्षण आम्हाला आयुष्य भरासाठी दिशा देणारं ठरलं' ही त्यांची भावना आहे.

सलग काम करत राहण्याची कोणाचीही शक्ती मर्यादित असते. या कारणांस्तव सेहतमध्ये फील्डला गेल्यावर तीन नमुना घटक पूर्ण झाल्यावर एक दिवस सुट्टी घ्यायची होती असे ठरले होते परंतु हे काहींना पुरेसं स्पष्ट नव्हतं, तर कधी एखाद्या गावातील काम लांबल्यामुळे सुटीचा दिवस पुढे मागे होत असे कारण पुढील गावाचं नियोजन झालेले असायचे. परिणामी सुरुवातीच्या टप्प्यात सलग काम केल्यानं मुलींवर शारीरिक, मानसिक ताण आला. काम वेळेत संपवायचं हा दबाव मनावर असायचा. कार्यक्षेत्रातील निवास व प्रवास व्यवस्था जशी उपलब्ध असेल त्याच्याशी जुळवून घेण्यातही श्रम खर्ची पडत होते. त्यातून घरापासून, घरच्यांपासून प्रथमच दूर राहिल्याने त्यांचीही आठवण यायची. या साऱ्याच्या परिणामी मनावर ताण यायचा याची बहुतेकींनी कबुली दिली. स्वत:ची कार्यक्षमता, परिस्थितीशी जुळवून घ्यायची ताकद कार्यक्षेत्रातील काम आणि अनुभवातून मिळाली, हेही अनेकजणींनी उदाहरणांसह सांगितलं.

शक्यतो सर्व जबाबदाऱ्यांची अन्वेषींशी चर्चा केली जात होती, त्यांची मते विचारात घेतली जात होती. याबद्दल सर्वांनी आवर्जून उल्लेख केला. तथापि प्रकल्पापूर्वी चर्चा करून घरमोजणीचं काम अन्वेषींवर सोपवलं. घरमोजणीच्या कामाचा खूप ताण पडला असं मत बऱ्याच जणींनी नोंदवलं. सर्वेक्षणाच्या आधीचा टप्पा म्हणजे घरमोजणी. प्राथमिक नमुना घटकातील घरं शोधणं, नोंदवणं हे या टप्प्यातलं काम आहे. हे काम स्वतंत्र टीमवर सोपवलं जातं. पण योग्य पात्रतेची टीम मिळाली नाही. विचारांती हे काम अन्वेषींच्या गटांनी करावं, घरमोजणीसह सर्वेक्षण एकाच भेटीत करावं हे ठरलं. हे काम आधी केलेलं नसल्यानं कामातील श्रमांची कल्पना नव्हती. कार्यक्षेत्रातील कामाला नवख्या असलेल्या मुलींना सुरुवातीला हा अनुभव काहीसा दमछाक करणारा वाटला. घरमोजणी अन्वेषींच्या गटानेच केल्याचा फायदाही नंतर त्यांना जाणवला. घरनोंदी करतानाच घरातील व्यक्तिंचा अंदाज आला, मुलाखतीसाठी घर शोधण्यात वेळ गेला नाही असे काही अनषंगिक लाभही झाले. शिवाय 'मुली असून आम्ही हे कष्टाचं आणि जिकीरीचं काम केलं याचा अभिमानही वाटला', असंही मत एका अन्वेषीनं नोदवलं.

सेहतविषयी एकीनं म्हटलंय संस्थेत प्रत्येकाच्या कामाचं मोल त्याचे कष्ट व वेळ यांचा विचार करून योग्यरितीने ठरविले जाते. उगाचच एखाद्या व्यक्तीकडून कष्ट करून घ्यायचे व त्याचा मोबदला अत्यंत कमी/उपकारास्पद द्यायचा हे इथे कधीच दिसलं नाही. त्यामुळे दुसऱ्या संस्थेत काम करताना त्रास होतो. फिल्डमध्ये येणाऱ्या अनुभवांचं शेअरींग ठेवण्यात आलं. यासाठी मुंबई ऑफीसमधून पण काही लोकं आली होती. हे मला खूपच आवडलं. कारण त्याची कमतरता/उणीव दुसऱ्या ठिकाणी काम करताना भासते. आपले अनुभव ऐकणे, आपले विचार ऐकणे त्याचा आदर करून त्यातील अडथळ्यांना मार्ग सुचविणे हे खूप कमी लोकांना जमतं.

सेहतच्या धोरणांविषयी एकीनं मांडलं की, इतर कामाच्या ठिकाणी मुलींना आपले काय अधिकार व हक्क असतात, त्यानुसार कशा जबाबदाऱ्या पार पाडाव्यात याविषयी पुरेशी माहिती नसते. मात्र सेहतमध्ये याउलट चित्र होते, की तिथे आमचे अधिकार, हक्क आणि जबाबदाऱ्या याची जाणीव करून दिली आणि जपवणूक ही केली. इथे आमचं काम केवळ काही महिन्याचं होत. तरीही त्यात अपघात पॉलीसी, मेडीकल इन्शुरन्स, अशा सुविधाही देण्यात आल्या होत्या. आमचे सर्व हक्क, जबाबदाऱ्या यांवर एकदम बारकाईने लक्ष देऊन आम्हाला ते मिळावेत याचा खूप चांगला प्रयत्न होता. कदाचित एवढे सगळे लाड, प्रेम आम्हांला दुसऱ्या कुठल्याच नोकरीच्या ठिकाणी अनुभवायला मिळणार नाही. एक उबदार असं नातं इथे तयार झालयं, दुसऱ्या ठिकाणच्या कामाच्या अनुभवावरून हे बोलताना, ऐकताना तुलनेत सेहतचं काम आणि तिथली लोकं आठवल्यावर मन भरून येतं.

विषयाची समज वाढावी कामाचे लाभ मिळावेत याबाबत दक्षता घेतली जात होती, त्याचप्रमाणे व्यक्तिगत पातळीवरही लक्ष दिले जात होते.

'फिल्डमध्ये काम करत असताना कामाबरोबर स्वतःची काळजी घ्या असं सांगितले जायचं. एकवेळेस घरचेही इतकी काळजी घेत नसतील एवढं सुनिताताई जेवण, तब्येत या विषयी सांगत असत. फिल्डमधून आल्यानंतर शेअरींग अनुभव, अडचणी याचं असायचं. आम्हाला आलेल्या अडचणी ऐकून घेतल्या जायच्या त्या सोडविल्या जायच्या. आमची मतं ही विचारली जायची आणि त्याचा विचारही व्हायचा. सेहतमध्ये आम्हाला अनेक सुविधाही मिळाल्या आमच्या जबाबदाऱ्याप्रमाणे हक्कही सांगण्यात आले. कदाचित सेहतमध्ये आम्हाला जी वागणूक मिळाली ती इतर कुठे मिळणार नाही. सेहतची आठवण सतत आमच्या मनात राहील.' हे एका अन्वेषीचं प्रातीनिधिक मत.

"मी लहानपणापासून फार सहनशील आहे. पण हा गुण कि अवगुण हा प्रश्न मला कायम पडतो. पण एक चांगला गुण सांगायचा झाला तर मी निराशावादी नाही. आपल्या आयुष्यामध्ये काही वाईट घडले तर त्या वाईट गोष्टीला कवटाळून बसणे मला आवडत नाही. त्यामधून काही नवीन घडवावे असे मला नेहमी वाटते. आपल्या अनुभवाने दुसऱ्यास काही मदत होणार असेल तर नक्कीच त्या व्यक्तीस मार्ग दाखवावा असे मला वाटते.

माझ्यात चांगले गुण जसे आहेत तसे वाईट गुण म्हणजे 'भित्रेपणा'. माझ्या भित्र्या स्वभावामुळे मी नेहमी मागे पडते असे मला नेहमी वाटते. परंतु 'सेहत' मध्ये आल्यापासून माझा हा स्वभाव बदलायला लागला आहे. थोडीशी धडाडी माझ्यामध्ये येत आहे याची जाणीव मला होऊ लागली आहे. कदाचित ग्रुप मध्ये रहाण्याचा हा परिणाम असावा. पण मी खरचं माझ्यातला हा बदल अनुभवते आहे. सहा महिन्यानंतर मी पूर्ण बदललेली असेल असा आत्मविश्वास माझ्यात नक्कीच आलेला आहे. याचे श्रेय तुम्हा सर्वांना (सेहत ग्रुप) द्यावे असे वाटते."

## वैयक्तिक बदलाचा प्रवास

आधी गर्भपात हा शब्दच भीतीदायक वाटायचा. पण या गंभीर विषयाकडे संवेदन क्षमतेनं पाहण्याची समज आली. 'स्त्री आरोग्य आणि गर्भपात' या विषयाची समज विशेषत्वाने विकसित झाली, असं बहुतेकजणींनी आवर्जून सांगितलं. स्त्री आरोग्याची माहिती घेतल्यानं, 'स्त्री आरोग्याच्या विविध पैलूंची ओळख झाली आणि संकोच गेला', असं प्रातिनिधिक मतंही एका अन्वेषीनं मांडलं. मुलाखतीत स्त्रियांनाही आम्ही मोकळेपणाने प्रश्न विचारू शकलो.

नोकरीचा फारसा अनुभव नसल्यानं 'आपल्याला सांगेल ते काम करायचं' ही सुरुवातीची भावना होती. तथापि इथलं वातावरण वेगळं होतं. 'अनुसूची तयार करताना वा अन्य वेळी आमचीही मतं आवर्जून विचारली जात होती त्यामुळे कामाबद्दल आपलेपणा वाढला.' कामातील सहभागाला वाव देणारं वातावरण होतं याचीही काहींनी आवर्जून नोंद केली. कार्यक्षेत्रातील कामात शारीरिक व मानसिक श्रम खूप होते. हे काम थकवणारं होतं. लोकांचा प्रतिसाद मिळेल किंवा न मिळेल ही अनिश्चितता होती. लोकांना आपलं म्हणणं पटवून देण्याचं आव्हान होतं. या सर्व अडचणींवर त्या त्या प्रसंगी योग्य तो मार्ग शोधण्याचाच गटाचा प्रयत्न राहिला. त्यामुळेच 'कार्यक्षेत्रातील कामांमुळे अडचणींवर मात करण्याची ताकद वाढली.'

वैयक्तिक पातळीवरही अनेक बदल झाल्याचे मुलींनी बोलून दाखवले. घरच्या सुरक्षित कोशात वावरलेल्या या मुलींना कधी घराबाहेर एकट्याने जाण्याची वेळही आली नव्हती.

कार्यक्षेत्रात ठिकठिकाणी फिरल्याने मात्र एकट्याने प्रवास करण्याची, अनोळखी माणसांशी संवाद साधण्याची भीती गेली.

आपल्या समजाव्यवस्थेत मुलींचा वावरच केवळ बंदिस्त केलेला नसतो, तर त्यांची अभिव्यक्तीही. त्यांनी फार बोलू नये, मोठ्याने हसू नये, चार माणसात गप्पा करत बसू नये असे त्यांच्या मनावर कायमचं दडपण असतं. परिणामी बोलण्याचीही भीती मनात तयार होत होती. आपण बोलतोय ते बरोबर आहे का, लोक हसतील का. याचं सतत दडपण वागवलं जातं. मुलींची अभिव्यक्ती अशाप्रकारे दबून जाते. एक अन्वेषी म्हणाली, 'लोकांत बोलायचंही दडपण वाटायचं. लोकांपुढे उभं राहून बोलायची कधी वेळंच आली नव्हती.' कार्यक्षेत्रातील कामात याच गोष्टी करायच्या होत्या. मुलाखती घ्यायच्या होत्या, गावसभांतून आपलं म्हणणं लोकांपर्यत पोहचवायचं होतं. सरावातून या गोष्टी जमायला लागल्यावर आत्मविश्वासही वाढला.

अन्वेषी गटातील बहुतेकजणी बेताच्या आर्थिक परिस्थितीत वाढलेल्या होत्या. मुलगी म्हणून केला जाणारा दुजाभाव त्यांना कधी कुटुंबाकडून तर कधी समाजाकडून अनुभवावा लागलेला होता. वैयक्तिक पातळीवरही काही जणी अत्यंत वाईट प्रसंगांना सामोऱ्या गेलेल्या होत्या. परिस्थितीच्या या चटक्यांमुळे त्यांच्या व्यक्तिमत्वालाही फुलायला वाव मिळालेला नव्हता. काहींनी दुःखाच्या कोषात स्वतःला बंदिस्त करून संवादाच्या वाटा मर्यादित केल्या होत्या. लोकांच्यात वावरून, त्यांच्याशी बोलून काम केल्याच्या अनुभवांनंतर मात्र व्यक्तित्वाच्या नकारात्मक छटा पुसट होत गेल्या. 'लोकांशी बोलण्याचं काम शारीरिक, मानसिक ताकद देणारं वाटतं,' असं ही सांगितलं. 'बोलून प्रश्न सुटतात हा विश्वास तयार झाला' असं दुसरीचं म्हणणं होतं.

'पुरुषांबद्दल मनात अपार राग होता, तो कमी झाला,' आणखी एकीचं म्हणणं होतं. या सकारात्मक विचाराचा आणखी एक पैलू म्हणजे, 'बारकाव्याने गोष्टींचा विचार करण्याची सवय लागली. एकांगी मत बदललं, कमी झाले,' लोकांवर पूर्वग्रह न ठेवता डोळस विश्वास ठेवायला हवा, हे समजलं विचाराच्या परिपक्वतेच्या परिणामी 'एकटेपणा कमी झाला' हे आणखी एकीचं मत होतं.

कार्यक्षेत्र संशोधनासारखे अनेक विविध आव्हानं असलेलं काम करण्यातून, 'स्वतःतील कौशल्यांचा विकास झाला', असंही बऱ्याच जणींना मनापासून वाटतं.

मुलींनी आर्थिकदृष्ट्या स्वतंत्र असण्याची गरज प्रत्येकीनंच बोलून दाखवली. 'अर्थपूर्ण जगायचं तर आपणही काहीतरी करायला हवं. स्वावलंबी, स्वयंपूर्ण असायला हवं.' हे स्वानुभवानं तयार झालेलं मत खूप महत्त्वाचं आहे. स्वावलंबी होण्याची ओढ, स्वातंत्र्याची गरज यामुळे पालकांवर असलेलं भावनिक अवलंबित्वही कमी व्हायला मदत झाली. 'आधी पालक काळजी घेतात ते छान सुरक्षित वाटायचं. आता त्यांनी आपलं मत विचारातं घ्यावं असंही वाटतं!' आपल्या आयुष्याच्या निर्णयात आपला सहभाग घ्यायला हवा या जाणीवेचा अंकूर फुटला आहे. कामाकडे बघण्याची दृष्टीही बदलल्याचं जाणवतं. काहींच्या मते, 'नोकरी ही पैशासाठी करायची असते असं सुरुवातीला वाटायचं आता शिकण्यासाठी काम करावं वाटतं.' नऊ महिन्यांच्या वाटचालीत मुलींनी बरंच संचित जमा केलं. त्यामुळे भविष्यातील भरारीला ताकद मिळेल, हे निश्चित.

# स्त्री-आरोग्य भारतातील परिस्थिती

* भारतातील एकूण लोकसंख्येच्या 35% जनता दारिद्र्यरेषे-खालील जीवन जगत आहे
* स्त्री पुरुष प्रमाण दर हजारी पुरुषांमागे ९३३ स्त्रीया हे आहे
* भारतातील 40% स्त्रीया शिकलेल्या आहेत
* वयाची २९ वर्षे पूर्ण होइपर्यंन्त पुरुषांपेक्षा स्त्रीयांचे मृत्यू जास्त आहेत
* 40% स्त्रीयांमध्ये प्रजनन संस्थेसंदर्भातील अजार आहेत
* गर्भावस्थेत होणाऱ्या स्त्रियांच्या मृत्यूपैकी 20% मृत्यू रक्तपांढरीमुळे झालेले आहेत
* 3% स्त्रीयांमध्ये प्राथमिक वंध्यत्व आहे
* 8% स्त्रीयांमध्ये दुसऱ्या गर्भधारणेसंदर्भातील वंध्यत्व आहे
* ग्रामिण भागात 46% स्त्रियांना कमजोरी (शक्तीहिनतेचा) अजार आहे
* कौटुंबिक हिंसा बलात्कार आणि लैंगीक छळवणूक यांचे प्रमाण नोंदवल्या गेलेल्या प्रमाणापेक्षा खूप जास्त आहे 20% ते 60% स्त्रीया जोडीदाराने केलेल्या शारीरीक हिंसा / छळाच्या बळी आहेत
* गर्भावस्थेतील स्त्रियांच्या मृत्यूचे प्रमाण दर लाख अर्भकांच्या जन्मामागे 540 स्त्रीया मृत्यूमुखी पडतात या मृत्यूमागील मुख्य कारण रक्तस्राव व असुरक्षित गर्भपात हे आहे

स्त्रियांचे आरोग्य - अन्वेषींनी तयार केलेल्या पोस्टर प्रदर्शनातून

आरोग्य मंत्री
सार्वजनिक आरोग्य सचीव    कुटुंब कल्याण कार्यक्रम
आरोग्य सेवा संचालनालय
आरोग्य सेवा महासंचालक
सहसंचालक
उपसंचालक
जिल्हा कार्यक्रम अधिकारी    जिल्हा आरोग्य अधिकारी
जिल्हा शल्यचिकीत्सक
ग्रामीण (आरोग्यसेवा) शहरी

**आरोग्य व्यवस्था-राजकीय यंत्रणा - अन्वेषींनी तयार केलेल्या पोस्टर प्रदर्शनातून**

# सहत बद्दल.....

सेहत CEHAT (Centre for Enquiry into Health and Allied Themes) हे अनुसंधान ट्रस्टचे संशोधन केंद्र आहे. आरोग्य विषयक लोकाभिमुख संशोधन व सामाजिक कार्य करण्यासाठी १९९१ साली सेहतची स्थापना झाली. आरोग्य व आरोग्य सेवा हा जनतेचा हक्क आहे हा समज समाजात घट्ट व्हावा या दिशेने सेहतचे संशोधन व इतर सामाजिक कार्य चालते. सेहतने १९९४ पासून सामाजिक आरोग्याच्या दृष्टीने महत्वाच्या खालील चार पैलुंवर पंचवीस पेक्षा जास्त प्रकल्प हाती घेतले आहेत-

१. आरोग्य-सेवा व त्याचे अर्थकारण

२. आरोग्य-विषयक कायदे व नैतिकता, रूग्णांचे हक्क

३. स्त्रियांचे खास आरोग्य प्रश्न

४. हिंसा व आरोग्य.

निव्वळ संशोधनावर समाधान न मानता आरोग्य क्षेत्रातील सत्ता-संतुलन जनतेच्या बाजूने झुकावे यासाठी गाव किंवा वस्तीपातळीवर आरोग्य कार्यकर्ता तयार करणे, परिणामकारक सेवेसाठी सरकारी व खाजगी आरोग्यक्षेत्रावर दबाव निर्माण करणे, खाजगी क्षेत्राच्या नियंत्रणासाठी पाऊले उचलणे, लोकांमध्ये त्यांच्या हक्कांसाठी जाणीव जागृती निर्माण करणे आणि एकंदरितच दुर्बल घटकांचा आवाज सक्षम करणे यासाठीही सेहत कार्यरत आहे. स्त्रियांचे काही दुर्लक्षित प्रश्न- गर्भपात, घरात होणाऱ्या हिंसेमुळे आरोग्यावर होणारा दुष्परिणाम, स्त्रीलिंगी गर्भपात या प्रश्नांवरही संशोधन, व जनमताचा दबाव निर्माण करण्याचे कामही सेहत करत आहे.

संशोधन व सामाजिक उपक्रमांची संख्या, त्यांचे विषय व कामाचा दर्जा यामुळे सेहतने थोड्याच काळात भारतातील या क्षेत्रातील एक अग्रगण्य संस्था असे नाव कमावले आहे. सेहत आपल्या घोषित उद्दिष्टांनुसार काम करत आहे ना हे पाहण्यासाठी एक स्वतंत्र समिती स्थापन केली गेली असून सेहतची सर्व कागदपत्रे या समितीला उपलब्ध असतात. या समितीचा अहवाल प्रसिध्द करण्याचे बंधन सेहतने स्वतःवर घातले आहे, पाळले आहे. हे बंधन व एकूणच लोकशाही निर्णय प्रक्रिया, पारदर्शकता, व संशोधन प्रकल्पांमध्ये नैतिक तत्वे पाळण्याचा आग्रह यामुळेही सेहत नावारुपाला आली आहे.